श्री

# फोटोंची माहिती

[ या फोटोंतील सर्व च व्यक्ति इतर अनेक दृष्टींनी थोर होत्या आणि आहेत. सत्कार्योत्तेजक सभेच्या श्रीसमर्थसंप्रदायादिविषयक कार्यांशीं असलेल्या त्यांच्या संबंधाचा च तेवढा उल्लेख येथें केला आहे ]

( १ ) लोकमान्य — ( १९१७ सालीं धुळ्यास आले असतां घेतलेला फोटो; रा. जोग व रा. मसूरकर हे स्वयंसेवकांचे मुख्य होते. )
आधुनिक महाराष्ट्राचें स्फूर्तिस्थान

( २ ) कै. डॉ. हरि श्रीकृष्ण देव, एल्. एम्. ॲण्ड एस्., धुळें
श्रीसमर्थसंप्रदायादिविषयक हरएक कामीं देवांना यांचें अतोनात साहाय्य झालें. शिवाय यांनीं आपल्या मृत्युपत्रानें सुमारें सोळाशें रुपये श्रीसमर्थकार्यासाठीं देवांना दिले. मृत्यु १९१८

( ३ ) रा. शंकर श्रीकृष्ण देव, बी. ए., एल्एल्. बी., वकील, धुळें
( १ ) संस्थापक, सत्कार्योत्तेजक सभा, धुळें – इ. स. १८९३
( २ ) चिटणीस, सत्कार्योत्तेजक सभा, धुळें–इ. स. १८९३ पासून
( ३ ) संपादक, रामदास आणि रामदासी मासिक, धुळें वर्षांक १ ते १६
( ४ ) संपादक, इतिहास आणि ऐतिहासिक मासिक, धुळें वर्षांक १–४
( ५ ) चिटणीस, विश्वस्तमंडळ, श्रीसमर्थमंदिर, जांब १९३२ पासून
( ६ ) कार्यकारी विश्वस्त, श्रीसमर्थवाग्देवतामंदिर, धुळें १९३५ च्या स्थापनेपासून
( ७ ) चिटणीस, श्रीसमर्थसंघ, धुळें – १९३९ च्या स्थापनेपासून

( ४ ) कै. काशीनाथ पांडुरंग पिंपळकरे, धुळें
संस्थापक, सत्कार्योत्तेजक सभा, धुळें

( ५ ) कै. विनायक जनार्दन करंदीकर ऊर्फ विनायक कवि, धुळें
संस्थापक, सत्कार्योत्तेजक सभा, धुळें

( ६ ) कै. शंकर भय्या मांडे, बी. ए., एल्‌एल्. बी., वकील, अमळनेर
*देवांचे सहकारी बालमित्र. मृत्यु १९००*

( ७ ) कै. गोविंद काशीनाथ चांदोरकर, बी. ए., एल्‌एल्. बी., वकील, धुळें
देवांचे सहकारी बालमित्र, प्रभात मासिकाचे संपादक, आर्यलिपी ग्रंथाचे कर्ते, 'इतिहास आणि ऐतिहासिक' मासिकाचे एक लेखक. मृत्यु १९२१

( ८ ) रा. गोपाळ रावजी गोगटे, बी. ए., एल्‌एल्. बी., वकील, भुसावळ
*देवांचे सहकारी मित्र, रामदासी मासिकाचे एक लेखक, श्रीसमर्थ-वाग्देवतामंदिराचे व जांबेच्या श्रीसमर्थमंदिराचे एक विश्वस्त*

( ९ ) रा. भास्कर वामन भट, वकील, धुळें
*देवांचे सहकारी मित्र, महाराष्ट्रधर्म ग्रंथाचे कर्ते,* 'रामदास आणि रामदासी' व 'इतिहास आणि ऐतिहासिक' मासिकांचे एक लेखक, स्थापनेपासून श्रीसमर्थवाग्देवतामंदिराचे एक विश्वस्त.

( १० ) कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे, बी. ए., धुळें
'रामदास आणि रामदासी' व 'इतिहास आणि ऐतिहासिक' या दोन्हीं मासिकांचे एक लेखक. मृत्यु १९२६

( ११ ) श्रीसमर्थमंदिर – जांब
चाळीस पंचेचाळीस हजार रुपये खर्चून श्रीसमर्थांच्या जन्मस्थळीं *महाराष्ट्रानें उभारलेलें श्रीसमर्थांचें सार्वजनिक स्मारकमंदिर.* तें महाराष्ट्रियांचें गुरुस्थान होय.

( १२ ) श्रीसद्गुरुसमर्थ – जांब
*जांब येथील श्रीसमर्थमंदिरांत स्थापन केलेली श्रीसमर्थांची मूर्ति*

( १३ ) कै. वामन नाईक साहेब, हैद्राबाद
स्थापनेपासून श्रीसमर्थवाग्देवतामंदिराचे एक विश्वस्त, जांबेच्या *श्रीसमर्थमंदिराच्या विश्वस्तमंडळाचे अध्यक्ष, श्रीसमर्थकार्याचे* सहाय्यकर्ते. मृत्यु १९३७

(१४) रा. अनंत सखाराम वर्णीकर, इंजिनियर, अहमदाबाद

त्रिविध कार्यास अनेक वर्षे दरमहा नियमित देणगी देऊन हजारों रुपयांची मदत केलेले आणि करीत असलेले श्रीसमर्थैकनिष्ठ

(१५) श्रीसमर्थवाग्देवतामंदिर — धुळें

देवांनीं गोळा केलेला हस्तलिखितांचा आणि कागदपत्रांचा संग्रह या मंदिरांत ठेवण्यांत आला आहे. हें मंदिर पंधरा हजार रुपये खर्चून सार्वजनिक पैशानें बांधण्यात आलें आहे. पांच वर्षें होत आलीं, स्थापनेपासून हें मंदिर, त्यांतील संग्रहासह, तेरा विश्वस्तांच्याद्वारा महाराष्ट्राच्या मालकीचें झालें आहे.

(१६) श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील श्रीसमर्थ

जांबेच्या मूर्तीचा हा फोटो मंदिरात मुख्य दरवाजासमोर उच्चासनावर ठेवण्यांत आला आहे.

(१७) प्रिन्सिपॉल जगन्नाथ रघुनाथ घारपुरे, बी. ए., एल्‌एल्. बी., सीनियर ॲडव्होकेट, फेडरल कोर्ट, मुंबई

(१) अध्यक्ष, विश्वस्तमंडळ, श्रीसमर्थवाग्देवतामंदिर, धुळें–मंदिराच्या स्थापनेपासून (२) श्रीसमर्थकार्याचें साहाय्यकर्ते.

(१८) नामदार गणेश वासुदेव मावळंकर, बी. ए., एल्. एल्. बी., वकील, अहमदाबाद

(१) विश्वस्त, श्रीसमर्थवाग्देवतामंदिर, धुळें – स्थापनेपासून
(२) अध्यक्ष, श्रीसमर्थसंघ, धुळें – स्थापनेपासून
(३) श्रीसमर्थकार्याचें साहाय्यकर्ते

(१९) श्रीमंत प्रतापशेट, अमळनेर

श्रीसमर्थवाग्देवतामंदिराचे स्थापनेपासूनचे एक विश्वस्त, श्रीसमर्थकार्याचे सर्वतोपरि साहाय्यकर्ते, त्रिविध कार्यास दरमहा तीस रुपये देणगी अव्याहत देणारे

(२०) रा. जनार्दन सखाराम करंदीकर, बी. ए., एल्‌एल्. बी., संपादक - केसरी, पुणें

विश्वस्त, श्रीसमर्थवाग्देवतामंदिर, धुळें – स्थापनेपासून

**( २१ ) रा. गणेश गोविंद टपले, बी. ए. (कॅंब्रिज), आय. एफ्. एस्., डिव्हिजनल फॉरेस्ट ऑफिसर, चांदा**

यांनीं आपले मातुल डॉ. हरि श्रीकृष्ण देव, मातुःश्री यमुनाई टपले व मातृस्वसा सौ. साळुताई निदोरे यांच्या स्मरणार्थ श्रीसमर्थ-वाग्देवतामंदिरास दीड हजार रुपयांची मदत केली.

**( २२ ) राजवाडेसंशोधनमंदिर – धुळें**

*महाराष्ट्रानें केलेलें कै. राजवाडे यांचें स्मारक. या मंदिरांत कै. राजवाडे यांना गंमद ठेवण्यांत आला आहे.*



॥ श्रीराम ॥

# कौशल सुमनहार

## प्रस्तावना

### (१) विशेषांक

या खास अंकाची कल्पना गेल्या श्रावणांत मनांत आली आणि त्या महिन्याच्या रामदासी मासिकाच्या अंकांत ती जाहीर हि करण्यांत आली. वास्तविक रामदासी मासिकाचें एकोणिसावें वर्ष सुरू होत आहे. रामदासी मासिकाचा हा एकोणिसाव्या वर्षाचा पहिला, म्हणजे क्रमांक २१७ चा अंक होय. पण रामदासी मासिकाचा पहिला अंक १८३७ च्या ज्येष्ठ शुद्ध १२ ला निघाला. त्यामुळें पहिला अंक निघाल्याला पंचवीस वर्षे पुरीं होत असल्यानें हा विशेषांक काढण्यांत येत आहे. श्री रामदास आणि रामदासी मासिकाला हा दिवस पहाण्याचें भाग्य लाभलें, हें श्रीसमर्थांच्या आशीर्वादाचें आणि महाराष्ट्राच्या कृपेचें फळ होय.

### (२) लेख

या अंकाच्या स्वरूपाविषयीं गेल्या श्रावणाच्या अंकांत मीं म्हटलें होतें कीं, "रामदासी मासिकानें महाराष्ट्राच्या वाङ्मयांत कांहीं नवीन भर घातली किंवा नाहीं, या मासिकामुळें आपल्या पूर्वजांच्या उज्ज्वल इतिहासावर कांहीं नवीन प्रकाश पडला कीं काय, वेळोवेळीं निर्माण झालेल्या श्रीसमर्थ-संप्रदायादिविषयक वादाच्या कामीं या मासिकाचें काय साहाय्य झालें, वाङ्मयाच्या आणि इतिहासाच्या क्षेत्रांपलिकडे या मासिकाकडून दुसरी कांहीं कामगिरी झाली किंवा नाहीं, या व अशा इतर अनेक दृष्टींनीं या मासिकाच्या कार्याविषयीं जाणत्यांनीं

आणि व्यासंगी विद्वानांनीं अभ्यासपूर्वक लिहिलेल्या लेखांचा त्या अंकांत समावेश करण्यांत यावा, असें आम्हांस फार वाटतें. पंचवीस वर्षें म्हणजे जवळ जवळ एका पिढीचा काळ! त्या काळांत रामदासी मासिकाकडून झालेल्या कार्याची कल्पना थोडक्यांत पण स्पष्टपणें ज्यावरून होईल असा तो अंक निघावा, असें आमच्या मनांत येतें." अशा स्वरूपाचा म्हणजे रामदासी मासिकाच्या कार्याविषयींचा एखाद दुसरा च लेख या अंकांत असेल, आणि तें सहाजिक हि आहे. पण याचा सारा बोल माझ्याकडे येतो. कारण या विशेषांकासाठीं लेख पाठविण्याविषयीं महाराष्ट्रांतील पंचवीस तीस विद्वानांना मी जीं पत्रें लिहिलीं होतीं, त्यांत च त्यांनीं श्रीसमर्थसंप्रदायादिविषयक विषयांवर लेख लिहावे अशी मोघम विनंति मी त्यांना केली होती.

या अंकांतील पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यांत आलेले लेख. किंबहुना रामदास आणि रामदासी मासिकाचा हा विशेषांक काढण्याचें सबंध श्रेय या लेखकांना आहे. हे लेख च मला मिळते ना, तर मी काय करणार होतों? रा. फडंदीकर, रा. भट, रा. टिळक, रा. गद्रे, रा. अनंतदास, रा. खेर हे रामदासी मासिकाचे जुने च लेखक आहेत. ती. नानासाहेबांचें तर बहुतेक लिखाण या मासिकांतून च प्रसिद्ध झालें आहे. पुण्याचे प्रो. शेजवलकर, नागपूरचे डॉ. पेंडसे आणि कऱ्हाडचे रा. अळतेकर अशासारख्या आणखी मराठी भाषेच्या आणि इतिहासाच्या व्यासंगी विद्वानांची कृपादृष्टि या मासिकाकडे वळली आणि त्यांच्या-सारख्या नाणावलेल्या लेखकांचे लेख या अंकांत प्रसिद्ध होत आहेत, याचा मला आनंद होणें सहाजिक आहे. मासिकाचे जुने लेखक आणि नवे लेखक असा भेद केल्यानें मी कोणाला अन्याय करतों किंवा कोणाला कमी लेखतों असें मला वाटत नाहीं. असा विचार च माझ्या मनांत येत नाहीं. सर्व च जण या मासिकाकडे आपलेपणानें पहात असतात, हें मला ठाऊक आहे. या विशेषांकाचें सारें श्रेय या अंकांतील लेखकांचें असल्यामुळें, या सर्व लेखकांचे कृतज्ञतापूर्वक आभार प्रथम मानणें हें मी माझें कर्तव्य समजतों; आणि या सर्वांचा व महाराष्ट्रांतील इतर लेखकांचा असा च लोभ या मासिकावर असावा, व सालोसाल श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पावयाचे "सुमनहार" गुंफण्याकरितां सर्वांनीं आगत्यपूर्वक "सुमनें" पुरवीत जावीं, अशी प्रार्थना करितों.

## ( ३ ) फोटो

नंतरची गोष्ट फोटोंची. एक ब्लॉक "केसरी" च्या सौजन्यानें मिळाला, दोन ब्लॉक लोकमान्यांच्या अंतुकाकांनीं मिळवून पाठविले आणि येथील राजवाडेमंडळानें दोन ब्लॉक दिले. सद्दीचा ब्लॉक सांगलीचे ह. भ. प. बावूराव

चीटणीस यांचेकडून आला. या साहाय्याबद्दल या सर्वांचा मी आभारी आहे. सत्कार्योत्तेजकसभेजवळ तीन ब्लॉक होते च, ते दोन ब्लॉक मला करून घ्यावे लागले आणि बाकीचे ब्लॉक सभेने मुंबईच्या गिरगांवांतील "मेसर्स डी. बी. आणि नीरॉय कंपनी" कडून करून घेतले; ते असे सुंदर करून दिल्याबद्दल आणि विशेषतः पूर्वीचा संबंध घ्यानीं घेऊन ते सवलतीच्या दरानें करून दिल्याबद्दल त्यांचे आभार मानणें उचित होय. ब्लॉकसाठीं निरनिराळ्या ठिकाणांहून फोटो मिळवावे लागले. ज्यांनीं फोटो मिळवून दिले त्यांना विसरून कसें चालेल ? त्यांचा मी आभारी आहे. आणखी अनेक व्यक्तींचे फोटो या अंकांत यावयास पाहिजे होते, हें माझें मला दिसत आहे. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, ते फोटो मिळविण्याचा प्रयत्न झाला नाहीं. त्यांची वेळ येईल तेव्हां ते हि फोटो या मासिकांत प्रसिद्ध होतील.

आणखी एका गोष्टीचा उल्लेख जरूर केला पाहिजे. ती. शंकर श्रीकृष्ण ऊर्फ नानासाहेब देव यांची परवानगी नव्हती एवढें च नव्हे, तर आपला फोटो मी या अंकांत प्रसिद्ध करूं नये अशी त्यांची सक्त ताकीद होती. असें असतां एक च नव्हे, तर त्यांचे दोन फोटो या अंकांत देऊन त्यांच्या दृष्टीनें ती. नानासाहेबांचा मी अक्षम्य अपराध केला आहे. आज हें लिहीत असतांना हि या अंकांत आपले फोटो येणार आहेत ही कल्पना हि मी ती. नानासाहेबांना येऊं दिलेली नाहीं. त्यामुळें माझ्या अपराधाची तीव्रता वाढलेली आहे. सत्कार्योत्तेजक सभेच्या हकिकतींत अनेकांचे फोटो देऊन, ती. नानासाहेबांचा च तेवढा फोटो मी दिला नसता, तर माझ्या संपादकीय कर्तव्यांत मी चुकलों, असें च झालें असतें. सारांश, वडिलांची आज्ञा पाळावी, का रामदासी मासिकाच्या संपादकाचें कर्तव्य करावें, असा माझ्यापुढें प्रश्न होता. या मासिकाच्या एकाद्या तिऱ्हाइत संपादकानें जें केलें असतें तें च करण्याचें शेवटीं मी ठरविलें. पण वडिलांच्या आज्ञेचा भंग करण्याचें पाप माझ्या हातून होण्यास आणखी एक कारण झालें; आणि तें हें कीं, या बाबतींत रामदासी मासिकाच्या वाचकांचा पाठिंबा मला आहे हें मला ठाऊक होतें. ती. नानासाहेबांचा फोटो या अंकांत येणार कीं नाहीं, अशी विचारणा हि पुणेंनाशिकच्या कांहीं ग्राहकांनीं माझ्याकडे केली होती. हेतु किती हि शुद्ध असला तरी, आणि संपादकीय कर्तव्य करीत असतांना का होईना, पण अखेरीस वडिलांच्या आज्ञेचा भंग करून त्यांचें मन दुखविण्याचें पाप माझ्या हातून घडलें हें नाकबूल करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आजपर्यंत ती. नानासाहेबांनी माझ्या अगणित अपराधांची क्षमा केलेली आहे, तशी च माझ्या हेतूकडे लक्ष देऊन या हि अपराधाची ते क्षमा करतील, अशी माझी खात्री आहे.

## ( ४ ) अठरा वर्षांतील लेखक

यानंतर ' रामदास आणि रामदासी ' मासिकाच्या अठरा वर्षांतील प्रपंचाविषयीं विचार करावयाचा झाल्यास प्रथम मासिकांतील लेखकांचें स्मरण झाल्यावांचून रहात नाहीं. या अठरा वर्षांत मासिकाच्या रंगीत पृष्ठांवर कोणी एखादी च कविता दिली, तर कोणी एखाद दुसरा च अभिप्राय लिहिला; कोणी सांप्रदायिक इतचर्चा केली, तर कोणी सांप्रदायिक विविध विषयांत भाग घेतला; कोणी सुमनहारांसाठीं सुमनें पुरविलीं, तर कोणी सांप्रदायिक ग्रंथांच्या प्रस्तावना लिहिल्या. दोन लेखकांनीं तर आपले दोन स्वतंत्र ग्रंथ च या मासिकांतून प्रकाशित केले. आणि कोणी कांहीं लिहिलें. सारांश, या ना त्या नात्यानें ज्या ज्या लेखकांचें लिखाण या मासिकाच्या अठरा वर्षांत त्यांत प्रसिद्ध झालें, त्या सर्व लेखकलेखिकांची यादी कालक्रमानुसार खालीं दिली आहे. लिखाण प्रसिद्ध झालेल्या मासिकाच्या वर्षांचे अंक त्या त्या लेखकांच्या नांवापुढें दिले आहेत.

( १ ) रा. शंकर श्रीकृष्ण देव, धुळें — वर्षांक १ ते १८

( २ ) इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे, धुळें — वर्षांक १ ते ४

( ३ ) रा. भास्कर वामन भट, धुळें — वर्षांक १, ८ ते १० व १७

( ४ ) रा. साधुदास, सांगली — वर्षांक १

( ५ ) रा. केशव लक्ष्मण ओगले, डोंबिवली — वर्षांक २ व ५

( ६ ) रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, नाशिक — वर्षांक २

( ७ ) रा. प्रेषित — वर्षांक ३

( ८ ) रा. सदाशिव — वर्षांक ३

( ९ ) रा. जनस्थानवासी — वर्षांक ३

( १० ) एक सन्मित्र — वर्षांक ३ व १७

( ११ ) रा. बाळ गणू — वर्षांक ३

( १२ ) श्रीमत् दासबोधाचा एक वाचक — वर्षांक ४

( १३ ) रा. श्रीसमर्थदास, इंदुरबोधन — वर्षांक ४

( १४ ) रा. शाहीर — वर्षांक ४

( १५ ) रा. कुवलयानंद, लोणावळें — वर्षांक ४

( १६ ) रा. वा. दा. मुंडले, इसलामपुर — वर्षांक ४

( १७ ) रा. बाळकृष्ण भाऊ जोशी, पुणें — वर्षांक ४
( १८ ) रा. श्रीचरणकिंकर — वर्षांक ४ व ७
( १९ ) रा. बाळकृष्ण मार्तंड चौंडे — वर्षांक ४
( २० ) रा. अनुचर — वर्षांक ४
( २१ ) रा. त्रिंबक बाळकृष्ण जोग, जबलपूर — वर्षांक ४
( २२ ) रा. नारायण रामदासी, मसूर — वर्षांक ५
( २३ ) रा. अमृत बापूजी रसाळ, शेवगांव — वर्षांक ६
( २४ ) मासिकाचा एक वर्गणीदार — वर्षांक ७
( २५ ) श्रीचरणाचा किंकर — वर्षांक ७
( २६ ) एक वाचक, कोरेगांव — वर्षांक ७
( २७ ) चरणकिंकर — वर्षांक ७
( २८ ) रा. रघुनाथ हणमंत कोटणीस, सांगली — वर्षांक ७
( २९ ) रा. यशवंत, चाफळ — वर्षांक ७
( ३० ) रा. दिनकर विनायक काळे, तळेगांव — वर्षांक ८
( ३१ ) रा. के. वि. गोडबोले, फलटण — वर्षांक ९
( ३२ ) रा. वामन दामोदर तळवलकर, पुणें — वर्षांक ११
( ३३ ) रा. अनंतदास रामदासी, गिरड — वर्षांक १२, १३ व १८
( ३४ ) रा. गणेश वासुदेव तगारे, शिराळे — वर्षांक १२
( ३५ ) रा. द. गो. काळे, पुणें — वर्षांक १४
( ३६ ) श्रीरामदासीचा एक कर्नाटकी वाचक — वर्षांक १५
( ३७ ) रा. जनार्दन सखाराम करंदीकर, पुणें — वर्षांक १६ ते १८
( ३८ ) रा. त्रिंबक रामकृष्ण गद्रे, अकोला — वर्षांक १६ ते १८
( ३९ ) रा. शिवाजीराव भावे, वर्धा — वर्षांक १६ व १८
( ४० ) रा. सदाशिव खंडो अळतेकर, कऱ्हाड — वर्षांक १६
( ४१ ) रा. ए. रा. नांदेडकर, धुळें — वर्षांक १६
( ४२ ) रा. बाळस्वामी, मुंबई — वर्षांक १६
( ४३ ) रा. गणपतराव पीराजी सनईवाले, बडोदे — वर्षांक १६

(४४) सौ. गिरिजाबाई केळकर, धुळें — वर्षांक १६
(४५) रा. अनंत विश्वनाथ टिळक, धुळें — वर्षांक १६ व १८
(४६) रा. गोपाळ रावजी गोगटे, भुसावळ — वर्षांक १६ ते १८
(४७) रा. प्रेष्य, जांब — वर्षांक १६
(४८) प्रो. शंकर वामन दांडेकर, पुणें — वर्षांक १६
(४९) रा. गणेश शंकर देव, धुळें — वर्षांक १७ व १८
(५०) श्री. शारदाबाई साठये, धुळें — वर्षांक १७ व १८
(५१) एक श्रीसमर्थसेवक, पुणें — वर्षांक १७
(५२) रा. नरहर वासुदेव शिदोरे, धुळें — वर्षांक १७ व १८
(५३) महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक, धुळें — वर्षांक १७
(५४) नामदार दादासाहेब मावळंकर, अहमदाबाद — वर्षांक १८
(५५) रा. तटस्थ, धुळें — वर्षांक १८
(५६) रा. वासुदेव वामन ठाकूर, इंदूर — वर्षांक १८
(५७) शा. प., धुळें — वर्षांक १८
(५८) रा. महादेव काशीनाथ खेर, इंदूर — वर्षांक १८

कोणी किती लिहिलें आणि काय लिहिलें याचें मला आज एवढेंसें वाटत नाहीं. आजच्या प्रसंगीं हें सारें च लिखाण मला सारख्या च योग्यतेचें वाटतें. सर्वांनीं च या मासिकाकडे इतक्या आपुलकीनें पाहिलें, या विचाराशिवाय अन्य विचार च आज माझ्या मनांत येऊं शकत नाहीं. या सर्वांचें सारखें च साहाय्य झालें आणि रामदासी मासिकावर यांचे हे थोर उपकार झाले, असें च मला वाटतें. त्या उपकारांचें मी आज कृतज्ञतापूर्वक स्मरण करतों.

## (५) अठरा वर्षांतील प्रकाशन

रामदासी मासिकाच्या प्रकाशनकार्याचा त्रोटक वृत्तांत या निमित्तानें महाराष्ट्रास थोडक्यांत सादर करावा असें मनांत येतें. या अठरा वर्षांत रामदासी मासिकांतून खालीलप्रमाणें ग्रंथ प्रकाशित झाले.

### श्री रामदास आणि रामदासी ग्रंथमाला

| ग्रंथाचें नांव | पृष्ठें |
|---|---|
| (११) श्रीसमर्थांचीं लघुकाव्यें .... .... | ३०७ |

म्हणजे रामदासी मासिकांतून या

### अठरा वर्षांत

### ९१९७ पृष्ठांचे लहानमोठे ३४ ग्रंथ

प्रसिद्ध झाले. याशिवाय सुमारें ६०० पृष्ठांचा मासिकाच्या मुखपृष्ठांवरील 'टिपणीसाचा खुलासा, विज्ञप्ति, अभिप्राय, वगैरे' या मथळ्याखालील व इतर मजकूर देण्यांत आला.

( १ ) श्री अंगलाई देवी – सज्जनगड, ( २ ) श्री सद्गुरुसमर्थ – जांब, ( ३ ) जांब येथील मारुतीचें देवालय, ( ४ ) जांब येथील ओट्याची जागा, ( ५ ) श्रीसमर्थमंदिर – जांब, ( ६ ) श्री कल्याण स्वामी, ( ७ ) श्रीसमर्थांचा किल्ला, ( ८ ) श्रीसमर्थांच्या हातचें वाल्मीकिरामायण, ( ९ ) स्वानुभवदिनकरकारांचें हस्ताक्षर, ( १० ) श्री शिवछत्रपतींचा १५७३ तील कौलनामा, ( ११ ) श्रीसमर्थवाग्देवतामंदिर वगैरे पंधरा वीस फोटो या अठरा वर्षांत रामदासी मासिकांतून प्रसिद्ध करण्यांत आले. या फोटोंचें महत्त्व नव्यानें आतां सांगावयास पाहिजे, असें नाहीं.

## (६) सत्कार्योत्तेजक सभा (८)

रामदास आणि रामदासी ग्रंथमालेचा पहिला भाग "श्रीमत् दासबोध" सत्कार्योत्तेजक सभेनें १८२७ च्या विजयादशमीस प्रसिद्ध केला. "आणखी सहा ग्रंथ प्रसिद्ध करण्यापुरती सामुग्री आमचेजवळ आज आहे" असें त्यावेळीं दासबोधाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. पण सालोसाल ही सामुग्री वाढत चालली आणि अवघ्या तीन वर्षांत च या सामुग्रीचे किती भाग होतील याचा अंदाज होईनासा झाला. ग्रंथमालेचा आठवा भाग "श्रीसमर्थप्रताप" १८३४ च्या विजयादशमीस प्रसिद्ध करण्यांत आला. पण ही सामुग्री इतकी वाढत चालली कीं, प्रतापाच्या प्रस्तावनेंत अकरा भागांची झालेली निश्चित योजना जाहीर करून न थांबतां ती. नानासाहेबांनीं लिहिलें कीं, "अकरा अकरा भागांचा एक एक सर, असे अकरा सर एकत्र करून त्यांना श्रीसमर्थांच्या चरित्राची गांठ देऊन, ही माला श्रीसद्गुरुंच्या कंठीं घातलेली डोळे भरून पहावी अशी इच्छा आहे!" आणि आतां तर नानासाहेब म्हणतात कीं, असे ३९० ग्रंथ प्रसिद्ध होतील, इतकी सामुग्री आज च श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत गोळा झालेली आहे.

सभेनें रामदास आणि रामदासी मासिक १८३७ त सुरू केलें. या मासिकाच्या पहिल्या अंकांत "मासिकाचा उद्देश" या लेखांत जे उद्देश देण्यांत आले आहेत, त्यांत एक उद्देश असा आहे कीं, "माला गुंफण्याचें कार्य हल्लीं ज्या गतीनें चालू आहे, त्या च गतीनें चालू राहिल्यास आपली इच्छा सफल होण्याचा योग या जन्मांत येणें नको! यासाठीं मालेला मासिकाची जोड करावी व कांहीं ग्रंथ मासिकांत प्रसिद्ध करावेत, म्हणजे माला गुंफण्याचें काम शीघ्रतर होईल, असा विचार करून हें मासिक पुस्तक आम्ही सुरू करीत आहोंत." आणि त्याप्रमाणें वर उल्लेखिलेले रामदासी ग्रंथमालेचे सव्वीस भाग मासिकांतून प्रसिद्ध झाले. मासिक सुरू होण्यापूर्वी रामदासी ग्रंथमालेचे कांहीं भाग स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत आले होते. सभेनें "श्री इतिहास आणि ऐतिहासिक" मासिक कांहीं काळ चालविलें होतें. त्याचे ३७ अंक निघाल्यावर तें बंद पडलें! त्यांतून इतिहास आणि ऐतिहासिक ग्रंथमालेचे सात भाग प्रसिद्ध झाले. त्याशिवाय महाराष्ट्रधर्मग्रंथमालेचे तीन भाग व इतर कांहीं पुस्तकें सभेनें प्रसिद्ध केलीं होती. या सर्वांची नोंद येथें करून ठेवणें इष्ट आहे, असें वाटतें.

### श्रीरामदास आणि रामदासी ग्रंथमाला

| ग्रंथाचें नांव | पृष्ठें |
|---|---|
| (१) श्रीमत् दासबोध (आवृत्ति सहावी) ... ... | ८०० |
| (२) श्रीसमर्थांचीं दोन जुनीं चरित्रें ... .... ... | २५२ |

| | | |
|---|---|---|
| ( ३ ) | श्रीरामदासांची कविता, प्रथमखंड .... .... | ५७२ |
| ( ४ ) | श्री रामीरामदासांची कविता .... .... .... | ५५२ |
| ( ५ ) | श्री श्लोक मनाचे ( आवृत्ति सहावी ) .... .... | २७१ |
| ( ६ ) | श्री स्वानुभवदिनकर .... .... .... ... | ५४२ |
| ( ७ ) | श्री दासविश्रामधाम .... .... .... .... | ९९८ |
| ( ८ ) | श्री समर्थप्रताप .... .... ... .... | २३६ |
| ( ९ ) | श्री संप्रदायाचीं कागदपत्रें, खंड पहिला .... .... | ५३५ |
| ( १० ) | श्री करुणाष्टकें ( आवृत्ति पहिली ) .... ... | २३४ |
| ( १२ ) | श्री सीतास्वयंवर .... ... .... .... | १६२ |
| ( ३१ ) | पहिला सुमनहार .... .... ... .... | ४०० |

श्री इतिहास आणि ऐतिहासिक ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | ऐतिहासिक विविध विषय, खंड पहिला .... | ३७९ |
| ( २ ) | शिवकालीन घराणीं .... .... .... | ३६० |
| ( ३ ) | पेशवाईची अखेर .... .... .... | २१६ |
| ( ४ ) | ऐतिहासिक विविध विषय, द्वितीय खंड .... | १९२ |
| ( ५ ) | शिवकालीन घराणी ( अपूर्ण ) .... .... | १३६ |
| ( ६ ) | ऐतिहासिक विविध विषय, तृतीय खंड, ( अपूर्ण ).... | ३२ |
| ( ८ ) | संस्कृत भाषेचा उलगडा .... .... ... | १३३ |

श्री महाराष्ट्रधर्म ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | श्री ज्ञानेश्वरी .... .... .... | ९२४ |
| ( श्री ) | श्री ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण .... | १५८ |
| ( २ ) | बालबोध .... ... .... | ३५६ |
| ( ३ ) | योगवासिष्ट ... ... .... | ११५ |

सभेचीं इतर पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| ( ११ ) | जपानची मर्दुमकी — आवृत्ति दुसरी ... .... | १६० |
| ( १२ ) | आर्यटिपी .... .... .... .... | ८२ |
| २५ | | ८५९७ |

म्हणजे आजपर्यंत सत्कार्योत्तेजक सभेनें

### १७९९४ पृष्ठांचे लहानमोठे ५९ ग्रंथ

प्रसिद्ध केले. या सुमारें अठरा हजार पृष्ठांपैकीं सुमारें नऊ हजार म्हणजे ९१३४ पृष्ठें श्रीसमर्थ, श्रेष्ठ, भीमस्वामी, वेणाबाई, दिनकर, आत्माराम, गिरिधर, मेरुस्वामी, राजारामप्रसादी यांचे मूळ ग्रंथ, पदपदांतरें, प्रकरणें, स्फुट श्लोक वगैरेंनीं व्यापिलीं असून कागदपत्रांसाठीं सुमारें दीड हजार म्हणजे १४६६ पृष्ठें लागलीं आहेत. बाकीच्या साडेसात हजार पृष्ठांत देव, राजवाडे, भट, चांदोरकर वगैरेंचें लिखाण प्रसिद्ध झालें आहे.

" श्रीदासबोधाचे कर्ते श्रीसमर्थ च " व " श्रीसमर्थांची शिकवण " हे रामदासी मासिकांतील सांप्रदायिक विविध विषयांत आलेले देवांचे लेख निराळे पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत आले होते. दासबोधाच्या प्रस्तावनेच्या हि स्वतंत्र प्रती काढल्या होत्या. या प्रस्तावनेची पांचवी आवृत्ति सध्यां सुरू आहे. " श्रीमत् दासबोध " व " श्री श्लोक मनाचे-सटीक " यांच्या सहा सहा आवृत्त्या निघाल्या. सर्व आवृत्त्या मिळून

### दासबोधाच्या १९००० प्रती

### व

### सटीक मनाच्या श्लोकांच्या २५००० प्रती

होतात. " मनाच्या श्लोकांचें नुसतें मूळ हि " सभेनें प्रसिद्ध केलें होतें. त्याची पांच हजारांची पांचवी आवृत्ति सध्यां संपत आली आहे. " जपानच्या मर्दुमकी "ची दुसरी आवृत्ति निघाली होती. श्रीसमर्थांच्या करुणाष्टकांची दोन हजारांची दुसरी आवृत्ति मुंबईचे बुकसेलर रा. केशव भिकाजी ढवळे, रामचंद्र बिल्डिंग, गिरगांव यांनीं प्रसिद्ध केली आहे. या शिवाय आणखी कोणत्या हि ग्रंथाची दुसरी आवृत्ति काढण्याचा योग सभेला लाभला नाहीं. असा हा सत्कार्योत्तेजक सभेच्या प्रकाशनाचा त्रोटक वृत्तांत, तो श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं निवेदिलेल्या सत्कार्योत्तेजक सभेच्या हकिकतीला पूरक असल्यामुळें, येथें दिला आहे.

## ( ७ ) थोडेंसें सिंहावलोकन

रामदासी मासिकांतून अठरा वर्षांत ९१९७ पृष्ठांचे लहान मोठे ३४ ग्रंथ प्रकाशित झाले. यांपैकीं २६ ग्रंथ रामदास आणि रामदासी ग्रंथमालेचे भाग आहेत. रा. भटांचा " महाराष्ट्रधर्म " हा ग्रंथ " महाराष्ट्रधर्म ग्रंथमाले " चा चौथा भाग होय. या ९१९७ पृष्ठांपैकीं ३८८९ पृष्ठें श्रीसमर्थ, दिनकर, आत्माराम, गिरिधर, मेरुस्वामी व राजारामप्रासादी यांच्या मूळ ग्रंथांनीं आणि कवितेनें व्यापिलीं आहेत. यांतील पुष्कळ च भाग पूर्वी महाराष्ट्राला अज्ञात होता. तो या मासिकानें प्रथम

प्रकाशांत आणला. पूर्वप्रकाशकांनीं प्रकाशित केलेलीं कांहीं प्रकरणें पुन्हां प्रकाशित केलीं, पण तीं शुद्ध स्वरूपांत प्रसिद्ध केलीं. पूर्वप्रकाशकांनीं अशुद्ध पाठ देऊन अर्थाचा अनर्थ कसा केला होता याचीं अनेक मनोरंजक उदाहरणें आतां सर्वांना ठाऊक झालीं आहेत. देवांचे टिकवणीचे धडे, राजवाडेदेवांचे संशोधनात्मक लेख, भटांचा 'महाराष्ट्रधर्म', शिवाजीराव भाव्यांचें मनाच्या श्लोकांवरील 'भाष्य', दुसऱ्या आणि तिसऱ्या सुमनहारांतील लेख वगैरे या मासिकांतून च प्रसिद्ध झाले आहेत. अशा रीतीनें रामदास आणि रामदासी मासिकानें महाराष्ट्राच्या वाङ्मयांत किती तरी नवीन बहुमोल भर घातली आहे, यांत शंका नाहीं.

रामदासी मासिकामुळें शेंकडो नवीन कवींची आणि त्यांच्या प्रकरणांची, आणि तशी च ज्ञात कवींच्या अप्रकाशित वाङ्मयाची माहिती महाराष्ट्रास झाली आहे. याशिवाय अन्य रीतीनें हि पूर्वजांच्या उज्ज्वल इतिहासावर नवीन प्रकाश पाडण्यास हें मासिक कारणीभूत झालेलें आहे, हें या मासिकाचे अठरा वर्षांचे अंक चाळल्यास कोणाच्या हि लक्षांत येईल. अशा शेंकडों बाबी नजरेसमोर येतात, पण मी येथें अवघ्या दोन च गोष्टींचा उल्लेख करणार आहे.

पहिली गोष्ट ही कीं, भोसले हे क्षत्रिय आहेत, जातिवंत रजपूत आहेत, ही गोष्ट सिद्ध करणारा बलवत्तर पुरावा या मासिकानें महाराष्ट्रास सादर केला. या मासिकांत प्रसिद्ध झालेल्या "सांप्रदायिक विविध विषय, प्रथम खंड" या ग्रंथांतील "श्रीसीतारामत्रयोदशाक्षरमंत्र आणि भोसल्यांचें क्षत्रियत्व" या रा. राजवाडे यांच्या लेखांत "महाराज शहाजी राजे" यांनीं विजापुरच्या अली आदिलशहाला पाठविलेलें पत्र देण्यांत आलें आहे. त्यांत शहाजी राजे पातशहाला लिहितात :

"आपके जागिरीन नाहक गैरहिसाबी पादशाह खरेल करवितहीं
तरी आपण रजपूत लोक
अवीतरल पेशजी हि दौंबा चौ पातशाहींत खिदमत केली आना
गैरहिसाबी जाजती सोसुनु दमइजतीन व गैरमेहेरबानीन
पेशजी हि खिदमत केली नाहीं व पुढें हि न करूं"

याहून दुसरा कोणता बलवत्तर पुरावा भोसल्यांचें क्षत्रियत्व आणि रजपूतत्व स्थापित करण्यास हवा? "राजा" हा किताब भोसल्यांच्या घराण्यांत पिढीजाद आहे. कोल्हापुर, अक्कलकोट येथील राजघराणीं आणि नागपुरचे राजे भोसले सुप्रसिद्ध च आहेत. पण मला परिचित असलेले "राजे भोसले" आमच्या खानदेशांतील सान्वेर रहातात, आणि त्या भागांत त्यांचा उल्लेख "राजे" म्हणून च केला जातो.

"श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें" या रामदासी मालेंतील नवव्या भागांत श्रीसमर्थांनीं आपल्या वयाच्या सहासष्टाव्या वर्षी लिहिलेलें, तें मावत ओळींचें, असतल मोडी पत्र प्रसिद्ध करण्यांत आलें आहे. त्यावरून किती तरी गोष्टी नव्यानें उजेडांत येत आहेत. समर्थांचें असें तें एक च गद्यात्मक पत्र प्रसिद्ध झालेलें आहे. शिवाय तें पत्र श्रीसमर्थांनीं स्वहस्तें लिहिलेलें असल्यामुळें त्या पत्राच्या आरंभींच्या आठ ओळींचा फोटो त्या भागांत दिला आहे. पण श्रीसमर्थांनीं स्वहस्तें लिहिलेली वाल्मीकि रामायणाची प्रत सभेला उपलब्ध झाल्याचें रामदासी मासिकानें महाराष्ट्राच्या कानीं घातलें आणि श्रीसमर्थांनीं आपल्या वयाच्या चौदाव्या वर्षी लिहिलेल्या आदिकांडाच्या शेवटच्या पृष्ठाचा फोटो देऊन बालश्रीसमर्थांच्या बालबोध हस्ताक्षराचें दर्शन रामदासी मासिकानें च महाराष्ट्राला घडविलें.

वेळोवेळीं श्रीसमर्थसंप्रदायादिविषयक अनेक लहानमोठे वाद निर्माण झाले. पण आज प्रामुख्यानें दोन च वाद माझ्या नजरेसमोर येतात. पैकीं एक वाद "दासबोध ग्रंथ कोणाचा" या विषयीं झाला. विद्यामयूर भैय्याशास्त्री देव जामखेडकर यांनीं "विविधज्ञानविस्तार" मासिकांत "दासबोधाचा कर्ता कोण" हा लेख लिहून सिद्धांत मांडला कीं, "दासबोधाचा कर्ता रामदास नसून रामदासशिष्य च असला पाहिजे." दासबोध हा ग्रंथ कोणाचा अशी शंका महाराष्ट्राला कधीं च आली नव्हती. पण विद्यामयूरांनीं कल्पना काढली, आणि विविध ज्ञानाचा विस्तार करण्यासाठीं अवतरलेल्या विविधज्ञानविस्तारानें ती प्रसिद्ध करून आपल्या समजुतीप्रमाणें महाराष्ट्राच्या ज्ञानांत भर टाकण्याचा प्रयत्न केला. शास्त्रीबुवांच्या या विक्षिप्त कल्पनेचें सप्रमाण खंडण "श्रीमत् दासबोधाचे कर्ते दुसरे कोण असणार?" हा लेख लिहून या मासिकांत ती. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं केलें आहे.

दुसरा वाद झाला रा. (आतां प्रो.) न. र. फाटक आणि ती. शंकर श्रीकृष्ण देव यांच्यामध्यें. रा. फाटकांनीं हि नेमका विविधज्ञानविस्ताराचा च आश्रय घेतला आणि प्रतिपादिलें कीं, श्रीसमर्थांनीं स्वतः राजकारण केलें नाहीं, दुसऱ्यास शिकविलें नाहीं, व त्यांनीं आपल्या वाङ्मयांत 'राजकारण' हा शब्द 'चातुर्य' या अर्थी वापरला आहे! पहिल्या वादांत देवांच्या उत्तराला प्रत्युत्तर देण्याचें धाडस शास्त्रीबुवांना किंवा त्यांच्यावती दुसऱ्या कोणाला हि झालें नाहीं. पण हा दुसरा वाद जरा चुरशीचा झाला! त्यांत उत्तरें प्रत्युत्तरें झालीं. हा दुसरा वाद उत्पन्न झाला तो श्रीशिवसमर्थांची "पहिली भेट" कधीं झाली या वादांतून. ती. शंकर श्रीकृष्ण देवांची काय किंवा रामदासी मासिकाची काय, या दोघांची हि भूमिका सत्यान्वेषणाची होती, आहे आणि राहील. "श्रीसमर्थांचें अवतारकार्य" या आपल्या लेखांत देवांनीं आपली भूमिका स्पष्ट केली च आहे. ते

लिहितात : " तुमच्या इच्छेस येईल तसें तुम्ही खुशाल धरून चाला. आम्हांस तर श्रीसमर्थ जसे होते तसे पहावयाचे आहेत. इतर कोणी किती हि ओढाताण केली, तरी या वादांत माझी भूमिका सरळ अशी आहे कीं, **माझ्या मतें श्रीसमर्थ आणि श्रीशिवछत्रपति हे दोघे हि स्वतंत्र स्वयंभु अवतारी पुरुष होत.** त्या दोघांची जन्मांत हि कधीं भेट झाली नव्हती, असें जरी उद्यां सिद्ध झालें, तरी त्या दोन थोर महापुरुषांविषयीं मला वाटणारा आदर यत्किंचित् हि कमी होणार नाहीं. त्या उभयतांचा थोरपणा एकमेकांवर अवलंबून नव्हता आणि नाहीं. " असें असतांना देखील या वादांत कटुपणा उत्पन्न झाला तो अशामुळें कीं, रा. फाटकांनीं श्रीसमर्थांच्या चारित्र्यावर च शितोडे उडविण्याचा प्रयत्न केला ! " आपल्यावरून जग ओळखण्याच्या *सामान्य पद्धतीस अनुसरून चरित्रें रचणाऱ्या सांप्रदायिकांनीं* " लिहिलेलीं श्रीसमर्थांचीं " चरित्रें विश्वसनीयतेच्या मोलानें स्वीकारल्यास रामदासांच्या चारित्र्याचे कसे धिंडवडे निघतील हें *गळीं उतरण्यासाठीं मूळांतल्या कथा इजेटांत* आणल्या गेल्या, " तसें करण्यांत आपला दुसरा तिसरा कांहीं हेतु नव्हता, आपण त्या कथा विश्वसनीय मानल्या नाहींत आणि आपण श्रीसमर्थांची निंदा केली नाहीं असें म्हणून रा. फाटकांना आपली भूमिका पुढें बदलवी लागली ! कसें हि असो, हा वाद मोठा निकराचा झाला. रा. फाटक यांना वकीलीच्या धंद्याची आवड होती, त्यांनीं कायद्याचा कांहीं अभ्यास हि केला आहे आणि अजून हि ते " लॉ रिपोर्टर " सारखीं कायद्याचीं पुस्तकें मधून मधून वाचीत असतात हें मला ठाऊक आहे. आपल्या बाजूचें लंगडें आणि डळमळणारें स्वरूप माहीत असतांना हि या वादांत रा. फाटक यांनीं आपली बाजू एखाद्या कसलेल्या वकीलाप्रमाणें मांडली होती, यांत शंका नाहीं. रा. फाटकांच्या लेखांना उत्तर म्हणून " श्रीसमर्थांचें राजकारण " हा आपला लेख रामदासी मासिकांत लिहून देवांनीं रा. फाटकांच्या भ्रामक प्रतिपादनाचें आविष्करण करून सप्रमाण खंडण केलें आहे. " दासबोध ग्रंथ कोणाचा " याविषयीं जरी महाराष्ट्रास कधीं च शंका नव्हती, तरी च श्रीसमर्थांनीं स्वतः राजकारण केलें किंवा नाहीं, त्यांनीं दुसऱ्यांस राजकारण शिकविलें किंवा नाहीं, आणि दासबोधांतील ' राजकारण ' या शब्दाचा अर्थ काय, याविषयीं हि महाराष्ट्रास कधीं च शंका नव्हती. असो. त्या त्या वेळीं महाराष्ट्रांत माजलेल्या या दोन वादांत रामदास आणि रामदासी मासिकानें प्रमुख भाग घेतला होता.

पारमार्थिक आणि इतिहासाच्या क्षेत्रांपलिकडे रामदास आणि रामदासी मासिकाकडून झालेल्या दोन प्रमुख गोष्टींचा उल्लेख करणारा वाटतो. या दोन्ही गोष्टींचें श्रेय पूर्णतः महाराष्ट्राचें आहे हें खरें, पण त्यांत रामदास आणि रामदासी

मासिकाचा हि कांहीं वाटा आहे. अगदीं अलिकडची गोष्ट म्हणजे

**धुळ्याचें श्रीसमर्थवाग्देवतामंदिर.**

ती. शंकर श्रीकृष्ण देवांनीं जमविलेल्या हस्तलिखितांचा आणि कागदपत्रांचा सारा संग्रह या मंदिरांत ठेवण्याला आणि तेव्हांपासून तो महाराष्ट्राच्या मालकीचा झाल्याला आतां पांच वर्षे होत आलीं. या मंदिरासाठीं पैसा गोळा करण्याची दगदग देवांनीं च केली; पण देवांच्या संग्रहांतील बाडांची क्रमवार जंत्री ( वर्णनात्मक यादी ) त्यावेळीं रामदासी मासिकांत " श्रीरामदासी संशोधन " या नांवानें सुरू होती. या ग्रंथाचा ४०८ पृष्ठांचा प्रथम खंड, त्याच्या ६२ पृष्ठांच्या सूचीसह, मंदिराचें बांध काम सुरू होण्यापूर्वी किती तरी अगोदर प्रसिद्ध झाला होता. त्या वर्णनात्मक यादीवरून पुण्याच्या एका अडाणी संपादकाखेरीज बाकीच्या साऱ्या महाराष्ट्राच्या ध्यानीं या संग्रहाचें महत्त्व आलें होतें. संग्रहाचें महत्त्व ओळखून श्रीसमर्थवाग्देवता-मंदिराच्या उभारणीस सर्वांनीं आर्थिक साहाय्य करावें, अशी विनंति अनेक वर्तमानपत्रकारांनीं जनतेस केली होती. उदाहरणार्थ, मुंबईच्या " नवा काळ " पत्रांत संपादकांनीं लिहिलें होतें कीं, " ग्रंथालयें म्हणजे विद्यापीठें ही कार्लाइलची व्याख्या ध्यानीं आणून श्रीसमर्थवाग्देवतामंदिराचा विचार केल्यास **भागवत धर्माच्या गेल्या पांचसहाशें वर्षांतील स्थितिगतीच्या अभ्यासाला साधनें पुरविणारें हें एक विद्यापीठ च व्हावयाचें आहे,** असें कळेल व प्रत्येकाला यथाशक्ति या कार्याला साह्य करावेंसें वाटेल. " मंदिरांतील संग्रहाचें महत्त्व महाराष्ट्राला पटवून देण्याचें काम रामदासी मासिकांतील वर्णनात्मक यादीनें केलें, आणि म्हणून त्या दृष्टीनें, तेवढ्यापुरतें तरी, श्रीसमर्थ-वाग्देवतामंदिर उभारण्याच्या कामीं रामदासी मासिकाचें साहाय्य झालें आहे, असें निःसंशय म्हणतां येईल.

थोडासा अहंकाराचा – अभिमानाचा – वास येईल, पण म्हणून खरें बोलण्याचें टाळतां येत नाहीं, तेव्हां तो दोष पत्करून म्हणावेसें वाटतें कीं, वाङ्मयाच्या आणि इतिहासाच्या क्षेत्रापलिकडे रामदास आणि रामदासी मासिकानें जी अतिशय महत्त्वाची गोष्ट केली ती म्हणजे

**जांब येथील श्रीसमर्थमंदिर**

होय. रामदासी मासिक निघाल्यापासून तिसऱ्या च वर्षी या मासिकांत एक नवीन उपक्रम सुरु करण्यांत आला. " श्रीसांप्रदायिक वृत्त, चर्चा वगैरे " असें आणखी एक सदर तेव्हांपासून या मासिकांत सुरु करण्यांत आलें. त्यांत सांप्रदायिक वृत्त, सांप्रदायिक चर्चा, जीर्णोद्धारकार्ये, संशोधनवृत्त, शंका व समाधान, पृच्छा वगैरे पोटसदरें असावीं, असें ठरलें. या नवीन सदराचा म्हणजे " श्रीसांप्रदायिक वृत्त, चर्चा वगैरे " चा सातवा खंड सध्यां मासिकांत सुरु आहे. " श्रीसंप्रदाय-जीर्णोद्धारकार्याचा जमाखर्च " देण्याचा रामदासी मासिकाच्या चौथ्या वर्षाच्या

पहिल्या अंकापासून सुरवात झाली आणि त्या अंकांत १८४० ज्येष्ठ शु. ११ पर्यंतचा जमाखर्च देण्यांत आला. पैशी तरी दिलेल्या ६५ रुपयांपासून सुरु झालेल्या जीर्णोद्धार फंडाची रक्कम तोंपावेतों सारी ९८ च झाली होती! अशा स्थितीत जीर्णोद्धारफंडाची रक्कम अवघी रु. ६१०–०–९ झाली असतांना, सज्जनगडची आणि चाफळची जीर्णोद्धाराचीं कार्यें होतील, पण श्रीसमर्थांचें जन्मस्थान जांब मोगलाईत, महाराष्ट्राबाहेर, आडबाजूस असल्यामुळें "जांबेकडे महाराष्ट्राचें चित्त लवकर लागणार नाहीं" अशी आपल्याला वाटत असलेली भीति १८४० पौष शुद्ध ११ च्या रामदासी मासिकाच्या अंकांत प्रदर्शित करून ती. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं लिहिलें कीं, "श्रीसमर्थांची जी जन्मभूमि, ते प्रथम ज्या ठिकाणीं अवतरले, ज्या घरांतल्या वडगळीच्या खोलींत ते 'विश्वाची चिंता' करीत बसत, बरोबर त्या च जागीं आधीं श्रीसमर्थांचें मंदिर बांधून त्यांच्या मूर्तीची स्थापना व्हावी! या कार्यासाठीं महाराष्ट्रापाशीं पंचवीस हजारांची भीक मागितली तर ती महाराष्ट्रास जड वाटेल काय?" फंड हळुहळू वाढूं लागला, जीर्णोद्धारविषयक टांचणें नवीन सदरांत देण्यांत येऊं लागलीं आणि जीर्णोद्धार-कार्यांचा जमाखर्च महाराष्ट्रास रामदासी मासिकाच्याद्वारा सादर होऊं लागला. हें सारें हळुहळू होत असतां देवांच्या मुखानें महाराष्ट्राची प्रकट झालेली इच्छा पुरी होण्याचा योग, ती इच्छा प्रकट झाल्यापासून सुमारें तेरा वर्षांनीं आला. कारण जांब येथें श्रीसमर्थांच्या जन्मस्थानीं चाळीस पंचेचाळीस हजार रुपये खर्चून महाराष्ट्रानें बांधलेल्या श्रीसमर्थमंदिरांत १८५४ चैत्र शुद्ध ९ ला, श्रीरामनवमीला, श्रीसमर्थांच्या जन्मदिनीं, श्रीरामचंद्र आणि श्रीसमर्थ यांच्या जन्मवेळेला, श्रीसमर्थमूर्तीची विधिपूर्वक प्राणप्रतिष्ठा झाली. मंदिरासाठीं लागलेला सारा पैसा कांहीं थोड्या निष्ठावंत स्वयंसेवकांच्या सहाय्यानें देवांनीं गोळा केला आणि श्रीसमर्थांच्या नांवांतील जादूनें भारलेल्या बृहन् महाराष्ट्रानें तो आपुलकीनें दिला. पण यासाठीं महाराष्ट्राची अनुकूल मनोवृत्ति बनविण्याकरितां आवश्यक असलेलें सारें लिखाण देवांनीं रामदास आणि रामदासी मासिकाच्याद्वारा केलें. जांब येथील श्रीसमर्थमंदिराचा कळस पाहिल्या-शिवाय रामदास आणि रामदासी मासिकानें मरतां कामा नये, असें देवांनीं अनेक वेळां लिहिलें होतें, आणि म्हटलें होतें! म्हणून च आरंभीं म्हटल्याप्रमाणें थोडासा अहंकाराचा दोष पत्करून हि म्हणावेसें वाटतें कीं, देवांच्या हातीं सत्कार्योत्तेजक सभेचें — त्यांचें स्वतःचें — हें रामदास आणि रामदासी मासिक नसतें, तर बहुधा जांब येथील श्रीसमर्थमंदिर महाराष्ट्राच्या दृष्टीस पडतें ना! जांब येथील श्रीसमर्थमंदिर म्हणजे श्रीसमर्थांचें जन्मस्थान दर्शविणारें नुसतें खुणेचें चिन्ह नव्हे! या मंदिरांत श्रीसमर्थांची मूर्ति ज्या दिवशीं स्थापन झाली त्या

दिवशीच्या आपल्या अग्रलेखांत ज्ञानप्रकाशकार म्हणतात : " श्रीसमर्थांच्या या स्मारकमंदिरानें महाराष्ट्राच्या मोगलाईतील भाग व ब्रिटिश हद्दींतील भाग यांत एक फार चांगला दुवा निर्माण झाला आहे, यांत शंका नाहीं. " ही सर्वांची च भावना होती आणि आहे। असें हें महत्त्वपूर्ण मंदिर उभारण्याच्या कामीं रामदास आणि रामदासी मासिकाचें इतकें साहाय्य झालें याचा, माझ्यासारख्या या मासिकाच्या आजच्या हि संपादकाला, थोडासा अभिमान वाटला तर तो क्षम्य च ठरणार नाहीं कां ?

## ( ८ ) देवांचे श्रीसमर्थचरित्र

श्री रामदास आणि रामदासी मासिक ती. नानासाहेबांनीं काढलें आणि पहिलीं सोळा वर्षें संपादिलें. माझी ती पात्रता नाहीं हें आम्हां उभयतांना माहित असतांना हि, सतरा आणि अठरा या दोन वर्षांपुरती मासिकाच्या संपादनाची जबाबदारी ती. नानासाहेबांनीं मजवर टाकली आणि ती मी स्वीकारली. असें करण्यांत आम्हा दोघांचा एक च हेतु होता, आणि तो हा कीं, श्रीसमर्थांचें चरित्र लिहिण्यास ती. नानासाहेबांना सवड मिळावी. पण मला अनुभव मात्र उलटा आला. रामदासी मासिकाच्या संपादनाकडे पूर्वी जात असलेला नानासाहेबांचा काळ सत्कार्योत्तेजकसभेचें चिटणीसत्व, जांब येथील श्रीसमर्थमंदिराचें चिटणीसत्व, धुळ्याच्या श्रीसमर्थवाग्देवतामंदिराचें चिटणीसत्व, आणि श्रीसमर्थसंघाचें चिटणीसत्व, अशा या चिटणीसीच्या कामाकडे च जाऊं लागला! पहिल्या तीन संस्थांचें चिटणीसत्व निदान पूर्वीचें तरी होतें; पण श्रीसमर्थसंघाचें चिटणीसत्व गेल्यावर्षी ती. नानासाहेबांनीं आपण होऊन आपल्यावर लादून घेतलें. श्रीसमर्थसंघाच्या कार्याचें महत्त्व मी जाणत नाहीं, किंवा तें कमी लेखतों असें नव्हे. पण महाराष्ट्राला ती. नानासाहेबांनीं लिहिलेलें श्रीसमर्थचरित्र आतां लवकर हवें आहे. " श्रीसमर्थचरित्र बाहेर केव्हां येणार ? श्रीसमर्थवाग्देवतामंदिरास आतां पांच वर्षें होत आहेत; तरी आतां चरित्र बाहेर आलें पाहिजे अशी + + + + आग्रहपूर्वक आपणांस सूचना आहे " याप्रमाणें एका थोर व्यक्तीची सूचना नानासाहेबांना गेल्या महिन्यांत च कळविण्यांत आली आहे हें मला ठाऊक आहे. शिवाय नानासाहेबांची दृष्टि अधू होत चालली आहे. आपली दृष्टि अजियात जाईल कीं काय, अशी भीति मधूनमधून ते प्रदर्शित करीत असतात. दुसऱ्या कोणाचें मला ठाऊक नाहीं, पण मला ती. नानासाहेबांच्या मुखांतून निघालेलें श्रीसमर्थचरित्र नको असून त्यांच्या हातांतून — त्यांच्या लेखणींतून — उतरलेलें श्रीसमर्थचरित्र मला हवें आहे. मी असें कां म्हणतों हें कदाचित् दुसऱ्या कोणाच्या ध्यानांत येणार नाहीं; पण मला तें पूर्णपणें ठाऊक आहे. तेव्हां आतां कोण काय म्हणेल याची पर्वा न करतां, त्या त्या कार्याचा लोभ सोडून, आपल्या चतुर्विध

चिटणीसीच्या व्यापांतून मोकळे होऊन, आपल्या श्रीसमर्थचरित्राची हस्तलिखित प्रत शके १८६२ ज्येष्ठ शुद्ध ११ च्या श्रीसमर्थवाग्देवतामंदिराच्या वार्षिक समारंभाच्या प्रसंगीं नानासाहेबांनी श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पण केली पाहिजे. त्यांच्या रामदास आणि रामदासी मासिकाला इतका हट्ट नानासाहेबांपाशीं खचित धरतां येईल.

## ( ९ ) महाराष्ट्रवाचकांच्या सेवेसी

दोन वर्षांपुरती घेतलेली मासिकाच्या संपादकत्वाची जबाबदारी या अंकापासून मी त्यांची त्यांना परत करीत असतां, श्रीसमर्थचरित्राची सबब पुढें करून नानासाहेबांनी ती घेण्याचें नाकारलें ! आणि उलट शक्य असेल तितकीं वर्षें मी च हें मासिक आतां चालवावें अशी मला आज्ञा केली. रामदास आणि रामदासी मासिक महाराष्ट्राचें आहे, महाराष्ट्र तें आपलें मानतो, आणि महाराष्ट्राच्या मनांत असेल तितकीं वर्षें महाराष्ट्र तें चालवील. तेव्हां श्री रामदास आणि रामदासी मासिकाच्या वतीनें

> कायावाचामनोभावें । तुझा मी म्हणवीतसें ।
>
> हे लाज तुजला माझी । + + + + + + + + ॥

अशी महाराष्ट्राची प्रार्थना करून श्री रामदास आणि रामदासी मासिकाचा हा विशेषांक – श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पिलेला चौथा सुमनहार – महाराष्ट्र वाचकांच्या सेवेसी सप्रेम सादर करितों.

१८६२ वैशाख वद्य १४<br>( ता. ४-६-१९४० )<br>पुणें

गणेश शंकर देव



॥ श्रीराम ॥

## ॥ श्रीसद्गुरुस्तवन ॥

जाणावा तो गे तो चि येक धन्य साधु ॥ ध्रु० ॥

पूर्ण ज्ञाता समाधानी    दृश्य मिथ्या हें जाणोनी ।
कर्म उपासना मनीं    राखे क्रिया आदरें ॥ १

स्थूळ सूक्ष्म कारण    पिंड ब्रह्मांड शोधून ।
साक्षी वेगळा आपण    सोहंभावें जो तुरे ॥ २

सर्वसंगपरित्यागी    महानुभाव महायोगी ।
ऐसा पुंज जयालागीं    आंगीं नाहीं निशेप ॥ ३

वैरागी तो उदासीन    विशेष नैराशता जाण ।
लोलंगता हें वमन    जेणें मानिलें साचें ॥ ४

शांति क्षमा आणि दया    सर्वभूतीं उपजे जया ।
जैसे योल तैसी क्रिया    निष्ठावंत चळेना ॥ ५

काम क्रोध मद मत्सर    दंभ प्रपंचविस्तार ।
जेथें होती निर्विकार    सारासार स्वरूपीं ॥ ६

पतितपावन तो साचा    निगमा पार न कळे ज्याचा ।
म्हणे दत्तात्री तयाचा    संग करी निसंग ॥ ७



श्री

रामदास आणि रामदासी

भाग एकोणचाळिसावा

# समर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पिलेला

# चौथा सुमनहार

## (१)

## ' रामदास आणि रामदासी ' मासिकाचें कार्य

(लेखक-डॉ. शंकर दामोदर पेंडसे, एम्. ए., एम्. ओ. एल्., पीएच्. डी., शास्त्री, वेदांततीर्थ, नागपुर)

महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध समर्थभक्ताग्रणि श्री. शंकर श्रीकृष्ण ऊर्फ नानासाहेब देव यांनीं " रामदास आणि रामदासी " मासिकाचा पहिला अंक प्रसिद्ध केल्याला पंचवीस वर्षें झालीं. समर्थांच्या उपदेशाचें रहस्य त्यांनीं स्वतः प्रथम समजून घेतलें, आपलें संपूर्ण जीवन त्यांनीं उपदेशमय केलें आणि तो पावन उपदेश सर्व महाराष्ट्राला पोंचविण्याचें कार्य या मासिकाच्या द्वारें गेलीं दोन तपें अविरत चालविलें, या गोष्टी लक्षांत घेतल्या तर ' रामदास आणि रामदासी ' मासिक म्हणजे श्री. नानासाहेब देवांची मूर्तिमती तपश्चर्या आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

समर्थवाङ्मयाविषयींचें श्री. नानासाहेबांचें कार्य इतकें प्रचंड आहे कीं, त्याला अलिकडील इतिहासांत तोड नाहीं. स्वीकृत कार्याविषयीं अखंड तळमळ, अढळ श्रद्धा, विलक्षण चिकाटी आणि निरलस उद्योगशीलता या गोष्टींत श्री. नानासाहेबांचा हात धरणारे फारच थोडे लोक आजच्या महाराष्ट्रांत सांपडतील. समर्थवाङ्मय आणि त्यांतील उपदेश यांना, त्यांनीं एका दृष्टीनें

पुनरुद्धार केला. या विषयीं त्यांना प्रसिद्ध संत एकनाथमहाराज यांचीच उपमा दिली पाहिजे. ज्ञानेश्वरानंतर महाराष्ट्रावर यावनी आक्रमणाची जी भयानक आपत्ति आली त्यामुळें तीन अडीच शतकें महाराष्ट्राची सर्व बाजूंनीं पिछेहाट झाली. त्याचें स्वराज्य गेलें, स्वधर्माचा त्राता राहिला नाहीं, स्वभाषेंतील वाङ्मयाची सेवा उडाली आणि त्यांतील उपदेशाकडे लोकांचें लक्ष राहिलें नाहीं. लोक स्वधर्म विसरले आणि परधर्म पत्करूं लागले. या भयावह अधःपातापासून महाराष्ट्राला सांवरण्याचें कार्य एकनाथांनीं जेव्हां अंगीकारिलें तेव्हां प्रथमतः त्यांनीं ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली, भगवद्गीतेवरील त्या असामान्य टीकेंतील उपदेश लोकांना शुद्ध स्वरूपांत पोंचेल अशी योजना केली आणि आळंदीला जाऊन ज्ञानेश्वरांच्या समाधीचा जीर्णोद्धार केला. श्री. नानासाहेब देव यांच्या कार्याचें स्वरूप कांहींसें असें च आहे. समर्थवाङ्मय त्यांनीं शुद्ध स्वरूपांत प्रकाशित केलें, जें अप्रसिद्ध होतें तें प्रसिद्धीला आणलें; समर्थांच्या वाङ्मयाकडे पहाण्याची त्यांनीं यथार्थ आणि अभिनव अशी दृष्टि महाराष्ट्राला दिली, जांब येथें समर्थांच्या जन्मस्थानीं त्यांचें स्मारक उभारलें, अनेक वर्षं प्रवासाची दगदग सोसून त्यांनीं जी जुन्या मराठी वाङ्मयाची अमूल्य संपत्ति संपादन केली ती सुरक्षित ठेवण्याकरितां समर्थवाग्देवतामंदिराची उभारणी केली आणि शेवटीं महाराष्ट्राकरितां जमविलेली ही संपत्ति महाराष्ट्राच्या उपयोगाकरितां, ती ज्यांत ठेविली आहे त्या मंदिरासहित, विश्वस्तांच्या स्वाधीन ज्या दिवशीं त्यांनीं केली त्या दिवशीं आयुष्याचें सार्थक झाल्याची धन्यता त्यांना वाटली. या सर्व व्यापाची माहिती देऊन जनतेची सहानुभूति मिळविण्याचें कार्य त्यांनीं " रामदास आणि रामदासी " मासिकाच्या द्वारें केलें. या मासिकाच्या द्वारें ते अनेक वर्षं महाराष्ट्राशीं बोलत आहेत.

मासिकाच्या मुखपृष्ठाचा रंग हेतुपूर्वक ठरविला होता कीं काय हें सांगण्यास साधन नसलें तरी तो सामान्यतः भगव्या रंगासारखा असे आणि त्या वेषांत समर्थच मासिक पुस्तकाच्या रूपानें आपणाकडे आले आहेत असें वाटण्यासारखा आंतील मजकूर असे. तात्कालिक विषयांवरील स्फुट लिखाण मुखपृष्ठांवर देण्याची योजना असे आणि मजकुराप्रमाणें ही पृष्ठसंख्या क्वचित् वाढविण्यांत येई. या पृष्ठांवरील मजकूर तात्कालिक महत्त्वाचा असला तरी चटका लावणारा असे. पुस्तकपरीक्षणें हि थोडक्यांत पण मार्मिक अशीं या च पृष्ठांवर येत. मासिकाच्या अंतरंगांत एक दोन अभ्यासपूर्ण निबंध आणि एखादा अप्रकाशित ग्रंथ क्रमशः प्रकाशित होई. निबंधांत कित्येक वेळां संशोधनार्थ केलेल्या प्रवासाची व त्यांत पाहिलेल्या शिवथरच्या घळीसारख्या रमणीय स्थानांचीं जीं वर्णनें येत तीं वाचकांना तीं तीं स्थळें प्रत्यक्ष पहाण्याची स्फूर्ति देत. मासिकांतील बरेंच लिखाण श्री. नानासाहेब देवांचें आहे. त्यांची भाषाशैली

वैशिष्ट्यपूर्ण असून, अंतःकरणांतील जिव्हाळा तींत असल्यामुळें परिणामकारक झालेली आहे. समर्थांच्या उपदेशाच्या आधारें, या मासिकातून त्यांनीं महाराष्ट्राला जी शिकवण गेलीं २५ वर्षें दिली तिचें स्वरूप थोडक्यांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल:—

( १ ) स्वधर्म आणि स्वराज्य यांची नेहमीं सांगड असली पाहिजे. धर्मस्थापना हें साध्य आणि स्वराज्य हें त्याचें साधन असल्यामुळें याची ताटातूट कधींही होतां कामा नये. स्वार्थसाधन, उदरंभरण किंवा ऐश्वर्यसंपादन हीं स्वराज्याची अंतिम साध्यें होण्याइतकीं महत्त्वाचीं नाहींत. स्वराज्याचें ध्येय यापेक्षा उच्च असलें पाहिजे व स्वराज्याची परिणति धर्मराज्यात झाली पाहिजे. धर्माचा आणि राजकारणाचा कांहीं संबंध नाहीं असें म्हणून राजकारणाचा उपयोग केवळ स्वार्थसाधनाकरितां जेव्हां केला जातो तेव्हा त्या राजकारणाला अत्यंत किळसवाणें स्वरूप प्राप्त होतें. आणि असें राजकारण कधीं यशस्वी हि होत नाहीं. म्हणून स्वराज्याला स्वधर्माचें अधिष्ठान पाहिजे व या श्रेष्ठ भूमिकेवरून च राजकारण केलें पाहिजे म्हणजे तें यशस्वी होईल. अधिकाराची, ऐश्वर्याची अपेक्षा न करितां केवळ नि स्वार्थबुद्धीनें, धार्मिक कर्तव्य म्हणून मानव्याची सेवा करणारे लोक राजकारणात जितके अधिक असतील तितकें तें यशस्वी होण्याची अधिक निश्चिति असते. हरिकथानिरूपण आणि राजकारण याची सांगड समर्थांनीं याचकरिता घातली आहे. देशांत सत्ता कोणाची हि असो, आपल्यास त्याशी कांहीं कर्तव्य नाहीं, आपण केवळ हरिकथा करीत बसूं अशी वृत्ति धारण केली तर हरिकथा हि करण्याचें स्वातंत्र्य कांहीं दिवसानीं रहाणार नाहीं. देशांत स्वतःचें राज्य म्हणजे सत्ता असल्याशिवाय धर्मस्थापना किंवा धर्मरक्षण होणें अशक्य असल्यामुळें राजकारणाकडे लक्ष देणें अवश्य आहे. प्रपंचाकडे अगदीं च दुर्लक्ष केलें तर परमार्थ साधणें कठीण जातें, त्याप्रमाणें राजकारणाकडे दुर्लक्ष केलें असतां हरिकथा किंवा धर्माचरण हि साधत नाहीं. म्हणून स्वधर्म आणि स्वसंस्कृति रक्षिण्याचें सामर्थ्य ज्याच्यायोगें येईल अशा स्वराज्यस्थापनेकरिता राजकारण हि केलें च पाहिजे. धर्म आणि राजकारण याचा हा अन्योन्य संबंध लोकांच्या मनावर ठसविण्याचें कार्य "रामदास आणि रामदासी" मासिकानें गेलीं दोन तपें निष्ठेनें केलें आणि जे केवळ भौतिकवादी, जडवादी किंवा सुखवादी राजकारणी होते त्यांना धर्माकडे आणि अध्यात्माकडे हि लक्ष देण्यास लाविलें, आणि जे केवळ निवृत्तिवादी किंवा अध्यात्मवादी धार्मिक होते त्यांना राजकारणाकडे हि लक्ष दिलें पाहिजे असें वाटावयास लावलें. आधुनिक शिक्षणानें आलेला नास्तिकवाद आणि जडवाद नाहींसा करून, निवृत्ति आणि प्रवृत्ति, प्रपंच आणि परमार्थ, धर्म आणि राजकारण याचा समन्वय, राष्ट्राला अंतीं हितावह होणार

आहे ही गोष्ट या मासिकानें महाराष्ट्राच्या दृष्टीस प्राधान्यानें आणली. किंबहुना हें च या मासिकानें आपलें प्रमुख जीवितकार्य मानलें आहे.

( २ ) स्वधर्माकरितां स्वराज्यस्थापना हें साध्य ठरल्यावर याचें प्रमुख साधन म्हणून संघटनेचा पुरस्कार या मासिकानें केला. ज्यांना अधिकाराची लालसा नाहीं अशा निःस्वार्थी कार्यकर्त्यांची एक जूट घडवून आणणें साध्यसिद्धीकरितां आवश्यक आहे. समर्थांनीं " ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या । संतमंडळ्या शोधाव्या " किंवा " मराठा तितुका मेळवावा " या उपदेशांत बुद्धिजीवी आणि आयुधजीवी लोकांच्या संघटना करण्याची च सूचना केली आहे. संतमंडळ्यांनीं स्वधर्माचें महत्त्व लोकांच्या मनावर अव्याहत बिंबविल्यामुळें व ब्राह्मण-क्षत्रियांना त्यांच्या वर्णधर्माचें पालन करण्यास प्रवृत्त केल्यामुळें च स्वराज्य स्थापनेच्या प्रयत्नांना चोहोंकडून साहाय्य मिळालें, हा पुन्हा अर्थपूर्ण इतिहास लोकांच्या दृष्टीस, या मासिकानें आणला. साध्याची स्पष्ट कल्पना व महत्त्व लोकांना पटवून देण्याचें कार्य जर अव्याहत चाललें नाहीं तर साध्यसिद्धीचे प्रयत्न ढिले पडतात किंवा त्या प्रयत्नांची दिशा चुकते. साध्याविषयीं स्पष्ट कल्पना शिवाजी महाराजांच्या वेळीं महाराष्ट्राला जशी दिली गेली व जागृत ठेविली गेली तशी पेशव्यांच्या वेळीं सर्व भरतखंडांत ती प्रसृत व जागृत करण्याचा संघटित प्रयत्न न झाल्यामुळें च पानिपतवर मराठ्यांना एकाकी लढावें लागलें व पराभूत व्हावें लागलें, ही कै. राजवाड्यांनीं केलेली मीमांसा लक्षांत घेतली म्हणजे साध्याविषयीं स्पष्ट कल्पना देणाऱ्या बुद्धिजीवी व निस्वार्थी लोकांच्या संघटनेचें महत्त्व ध्यानांत येईल. समर्थांनीं आपल्या महंतांच्या द्वारें अशी च संघटना निर्माण केली होती. बुद्धिप्रधान लोकांच्या संघटनेप्रमाणें च, साध्यसिद्धीकरितां देशकालानुरूप प्रत्यक्ष प्रयत्न करणाऱ्या कर्तबगार लोकांची संघटना हि आवश्यक आहे. एका च ध्येयानें प्रेरित झालेले लक्षावधि लोक जेव्हां एकत्र येतात तेव्हा त्यांच्या पराक्रमानें आणि संघशक्तीनें साध्य प्रत्यक्ष सिद्ध होण्यास विलंब लागत नाहीं.

( ३ ) अशा रीतीच्या प्रचंड संघटना घडवून आणावयाच्या असतील तर त्या चुटकीसरशा घडून येत नाहींत, हें लक्षांत ठेवून, आजूबाजूच्या निराशाजनक परिस्थितीमुळें धीर सोडतां कामा नये. ही संघटना घडवून आणण्यासाठीं, अखंड तजविजी, अखंड चाळणा केल्या पाहिजेत व त्याकरितां आळस सोडून कामाला लागलें पाहिजे. आळस घात करणारा आहे तो टाकून द्या आणि " यत्नाला देव " मानून कामाला लागा हा समर्थांचा संदेश घरोघर पोंचून आळसाचा तिरस्कार आणि प्रयत्नाचा पुरस्कार या मासिकानें अव्याहत केला आहे. किंबहुना मासिकाचे उत्पादक आणि संपादक श्री. नानासाहेब देव यांचें संपूर्ण जीवन च, उद्योगशीलतेचें आणि प्रयत्नवादाचें मूर्तिमंत उदाहरण आहे. स्वतः प्रयत्नवादी बनून इतरांना तसें बनण्याचा उपदेश या मासिकाच्या द्वारें ते करीत आले आहेत.

(४) महान् कार्याच्या सिद्धीसाठीं प्रयत्नपूर्वक केलेली संघटना दुर्बल आणि लेच्यापेच्या लोकांची असून उपयोगी नाहीं म्हणून बौद्धिक, मानसिक व शारीरिक शक्तीच्या संपादनाचें महत्त्व या मासिकानें प्रतिपादिलें. मनानें आणि शरीरानें सशक्त असणारे लोक च पराक्रम करूं शकतात. प्रसंग पडेल त्याप्रमाणें मन व शरीर यांपैकीं एकाच्या किंवा दोघांच्या हि शक्तीचा उपयोग मनुष्याला करतां आला पाहिजे. म्हणून मन आणि शरीर यांपैकीं एकाकडे दुर्लक्ष न करितां दोन्हीं सशक्त बनविलीं पाहिजेत. राष्ट्रीय जीवनांत युक्ति आणि शक्ति या दोहोंचा उपयोग असल्यामुळें एकाला श्रेष्ठ आणि एकाला कनिष्ठ न मानितां शक्तियुक्तीच्या समन्वयाचा पुरस्कार करून " शक्तियुक्ति जये ठायीं । तेथें श्रीमंत धावती " या समर्थांच्या उपदेशाचें महत्त्व लोकांना पटविण्याची महत्त्वाची कामगिरी या मासिकानें केली.

... तात्पर्य, सशक्त व्हा, प्रयत्नवादी बना, आळस टाकून देऊन संघटित व्हा आणि संघशक्तीच्या साहाय्यानें स्वराज्यस्थापना करून स्वधर्म आणि स्वसंस्कृति यांचें संरक्षण करा, हा समर्थांचा तेजस्वी संदेश महाराष्ट्राच्या कानावर गेलीं पंचवीस वर्षे या मासिकानें घातला. जांब येथें समर्थांचें स्मारक उभारण्याची कल्पना महाराष्ट्राला पटवून प्रत्यक्ष स्वरूपांत आणली. ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास यांच्यासारखे सत्पुरुष ज्या प्रदेशांत जन्माला आले त्या प्रदेशाला महाराष्ट्र विसरला आहे. तो आपला आहे कीं नाहीं याची हि शंका त्याला वाटते. अशा स्थितींत भविष्यकालाच्या दृष्टीनें जांब येथें निर्माण केलेलें हें केंद्र अत्यन्त महत्वाचें ठरणार आहे. जुन्या मराठी वाङ्मयाचा अमूल्य संग्रह ज्यांत आहे तें समर्थवाग्देवतामंदिराचें अभ्यासकेंद्र हि या मासिकाच्या द्वारा प्रचार करून स्थापिलें गेलें. आणि आतां समर्थसंघाचा प्रसार आणि प्रचार हें मासिक करीत आहे. महाराष्ट्राच्या सद्यःस्थितींत अत्यंत आवश्यक अशी महनीय कामगिरी करणाऱ्या या मासिकाला दीर्घायुष्य लाभावें अशी समर्थचरणीं प्रार्थना करून हा लहानसा लेख संपवितों.



अफझुल्ल्यानाचा ' पोटल ' फोडून, शाहिस्तेखानाच्या आंगोळ्या तोडून शत्रूच्या छातींत धडकी भरविली असली, तर श्री समर्थांनीं सर्वत्र जागृति केली, जनतेला जाणीव करून दिली, कांटीनें कांटी झाडावयास सांगितलें, गुणवंतांचे गुण घेतले, बहुतांचें मनोगत हातीं धरलें, जेवढें जेवढें म्हणून आपल्याला माहित होतें तेवढें तेवढें दुसऱ्यास हळूं हळूं शिकविलें व कांहीं कटाकटी केली. एकाची तरवार चालली तर दुसऱ्याचा बोरू चालला, ज्या तरवारीनें आनंदवनभुवनांत स्नानसंध्येस शुद्ध पाणी मिळेल अशी समाधानाची जागा तयार केली त्या तरवारीला बोरूनें धन्यवाद च दिलेले आहेत.

## राजवाड्यांचें अलौकिकत्व

श्रीसमर्थांसारख्या महान् महाराष्ट्रीयाच्या वाग्गंगेचें महत्व व पावित्र्य महाराष्ट्राला फार अलीकडे समजूं लागलें आहे. आपल्या राष्ट्राचा इतिहास हि सरकारी दप्तरखान्यांत अटकून पडल्याकारणानें आपल्या क्षात्रतेजाची आपणांस विस्मृति होत चालली होती. जितांच्या शरीरसामर्थ्यापेक्षां त्यांचें मन मारणें याला राजकारणांत फार महत्व आहे म्हणतात! पण आपल्या सुदैवानें तो इतिहास हळूं हळूं आपल्या ताब्यांत येत आहे. परंतु राष्ट्रीय इतिहास कारावासांत असतांना हि अकटोविकटो प्रयत्न करून जर महाराष्ट्राचें वैभव कोणी निदर्शनास आणलें असेल तर ती विभूति म्हणजे इतिहासाचार्य राजवाडे च होय. कोणता हि विषय घ्या, राजकारण घ्या, भाषा घ्या, इतिहास घ्या, राजवाड्यांच्या पावलावर डोकें ठेवल्याशिवाय कोणा हि अभ्यासकाला पुढें पाऊल टाकतां च येत नाहीं. राजवाड्यांनीं आपलें सारें आयुष्य श्रीसमर्थरामदासस्वामीप्रमाणें वणवण करण्यांत घालविलें आणि ह्यावरून च कै. प्रो. भानु हे त्यांना नेहमीं ' रामदास ' असें च म्हणत असत. महाराष्ट्रांतील इतिहाससंशोधनास खरी सुरवात रा. ब. रानडे, लोकहितवादी, साने, खरे, पारसनीस यांनीं केली असली तरी एक रानडे सोडून राजवाड्यांसारखा अलौकिक पुरुष झाला नाहीं.

सन १८९३ सालीं धुळ्यास श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं

## सत्कार्योत्तेजक सभा

स्थापन केली; आणि सभेनें पुढें हातीं घेतलेल्या संशोधनकार्यांत श्री. देवांना श्री. गोविंद काशीनाथ चांदोरकर व श्री. भास्कर वामन भट यांचें साहाय्य झालें. श्री. देव व श्री. भट हीं दोन माणसें खरोखर व्यक्ति नसून संस्था होत. आज धुळें येथें असलेल्या

## श्रीसमर्थवाग्देवतामंदिर व राजवाडे–संशोधन–मंदिर

ह्या दोन संस्था म्हणजे श्री. देव व श्री. भट यांच्या तपश्चर्येचीं फळें होत.

राजवाडे संशोधन मंदिर—धुळें



रा. भास्कर वामन भट,
धुळें



कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे,
धुळें

( २ )

# महाराष्ट्रस्फूर्तीचें गंगावतरण

अर्थात्

## श्रीसमर्थभक्त शंकररावजी देव यांचा भगीरथ प्रयत्न

( लेखक--रा. मार्तंड बळवंत तरटे, बी. ए., ऑनर्स, धुळें )

' रामदास रामदासी ' मासिकाच्या गेल्या पावशतकाच्या भरीव कामगिरीचें आलोचन करण्याची पात्रता माझ्या अंगीं नाहीं आणि अेकाच मेंदूनें व लेखणीनें त्याचें वैभव चितारून दाखविण्याइतकें तें कार्य सुलभ हि नाहीं. तेव्हां तेवढें धाडस मी करीत नाहीं. खरें पाहिलें असतां माझ्या वयापेक्षां हि ज्याचें वय अधिक आहे त्याच्याबद्दल मी जरा जपून च बोलणें इष्ट नव्हे काय ?

रामदासी वाङ्मय म्हणजे महाराष्ट्र-सारस्वत-सागराच्या मुडाशीं सांपडलेलें मोत्यांचें साम्राज्य होय. परंतु तें एकट्यानें च वेंचणें कसें शक्य आहे ? त्यांतील भिकवाळीपुरतीं दोन तीन मोत्यें वेंचून आणलीं तरी पुरें !

### खरें स्फूर्तिदायक वाङ्मय

वाङ्मयाची कसोटी लावण्याचे प्रकार जगाच्या वाढत्या ज्ञानाबरोबर वाढत आहेत. केवळ बोललें जातें तें वाङ्मय असें म्हटल्यास माणसाच्या बोलण्यास निश्चितता येणार नाहीं. केवळ आदर्श असे एकदोन शब्द च वाङ्मय होऊं शकत नाहींत. कोणी म्हणतात कीं, केवळ आनंद देणारें तेंच वाङ्मय. परंतु ह्या आशावादी व खेळकर वाङ्मयाचा आनंद वेळ्या वाचनानन्तर व्यवहाराच्या समरभूमीवर उतरल्यावर हळूं हळूं विरूं लागतो. लटक्या उपवनांतून, पक्षांच्या किलबिलाटांतून, यक्षकिन्नरांच्या पद्मालयांतून प्रतीत होणारी आभासमय अनुभूति प्रत्यक्ष जीवनांत, गाडीबैलांच्या खडखडाटांत व छातीवर उभें राहून धाकधपटशा दाखवून काम करून घेणाऱ्या वरिष्ठांच्या आदळांत कायम राहिली तर च नशीब ! पण ती राहत नाहीं.

'तूं सुखी आहेस,' असें म्हणून खोटा आभास उत्पन्न करणें निराळें व 'तूं संकटांत आहेस,' असें म्हणून आश्वासनपूर्वक उपदेशाची पांख उभारणें निराळें. 'तूं पापी आहेस, तेव्हां हा प्रपंच सोडून कुठें तरी काळें कर,' असें म्हणणें निराळें आणि; "छे! तूं शूर आहेस, तूं धीर धर आणि चांगला प्रपंच करून देशाचा उद्धार कर!" असें म्हणणें निराळें. यांतील खरा उपदेश कोणता हें शुद्धास तेव्हां च समजणार आहे.

धीर्धरा धीर्धरा तकवा। हडबडूं गडबडूं नका।
काळ देखोनि वर्तावें। सांडावें भय पोटिंचे

असा खडबडून उपदेश करणारें व सर्वत्र म्लेंच्छमय पृथ्वी झाली असतां आपल्या क्षात्र तेजाची जाणीव करून देणारें व तद्भव शिक्षेची परंपरा कायम ठेवणारें वाङ्मय म्हणजे खरें स्फूर्तिदायक वाङ्मय होय.

## महाराष्ट्रस्फूर्तीची गंगोत्रि

समर्थ संप्रदायाचें वाङ्मय म्हणजे महाराष्ट्र-स्फूर्ति-सरितेचें उगमस्थान होय. ती गंगोत्रि होय. ज्ञानेश्वरांच्या वाङ्मयाला मी आंबराईची उपमा देईन, कारण सर्वत्र लगडून आलेले काव्यमोहोर तेथें आपणांस दृष्टीस पडतात. नामदेवांचें वाङ्मय म्हणजे भागवतधर्माचा जयजयकार! नाथांचें वाङ्मय म्हणजे गुरुभक्तिप्रधान सुधारणेचें वाङ्मय होय. परंतु श्रीसमर्थवाङ्मयांत वर उल्लेखलेली निराळी च दैवी शक्ति अनुस्यूत असलेली दिसते.

महाराष्ट्राच्या सर्वांगीण अवनतीला यादवांच्या अस्ताबरोबर सुरवात झाली, जनतेच्या राजकीय हक्कांना एकदांचें समास मढण लागलें आणि पारतंत्र्याच्या राहुकेतूंनीं धार्मिक आणि सामाजिक हक्कांना पार गिळून टाकलें. त्यांत दुर्गादेवीच्या दुष्काळानें जीविताला आग लाविली व सर्वांची वाताहत केली. महाराष्ट्रीय संस्कृतीचा उच्छेद झाला. अशा विकट परिस्थितींत समाजसुधारणेचा पाया नाथांनीं घातला. परंतु खच्ची झालेल्या राष्ट्रांत जिवंतपणा येण्यास दोन तीन शतकें विलंब लागला. तें मेलें नव्हतें, परंतु निद्रित होतें. तेवढ्यांत श्री शिवसूर्याचा प्रभातकाळ झाला व त्याचें तेज सर्वत्र सळपूं लागलें. श्रीसमर्थांनीं भिक्षामिषें सर्व जनता परीक्षून सोडली, त्यांनीं समाजाची उठावणी केली आणि असल्या तुफान प्रसंगांत चारी बाजूंनीं हांकेस 'ओ' येऊं लागले.

## तरवार व बोरू

श्रीशिवाजी महाराज व श्रीसमर्थ हे दोघे स्वयंभू व अलौकिक कर्तृत्ववान् पुरुष होत. महाराजांनीं आपली प्रभाची तरवार धर्मंतत्पर केली असली, त्यांनीं



कै. शंकर भय्या मांडे, धुळें

कै. गोविंद काशिनाथ चांदोरकर — धुळें

रा. शंकर श्रीकृष्ण देव — धुळें

सत्कार्योत्तेजक सभेच्या प्रयत्नांना पुढें कै. राजवाडे यांचें हि साहाय्य होत गेलें.

श्रीसमर्थांच्या वाङ्मयावर व जीवितावर स्वच्छ प्रकाश पाडण्याचें सारें श्रेय बहुशः सत्कार्योत्तेजक सभेला च आहे. श्रीसमर्थांच्या वाङ्मयाकडे पहावयाचें नवें तंत्र श्री. देव यांनीं च शिकविलें. श्रीसमर्थ हे संत होते हें खरें, परंतु ते राजकारणी संत होते ह्या श्री. देव ह्यांच्या सिद्धान्ताला महाराष्ट्रवाङ्मयांत फार महत्त्व आहे. हा विचार अंतःकरणांत सांठविला म्हणजे श्रीसमर्थ व त्यांच्या परंपरेंतील वाङ्मयाचें वैभव दृष्टोत्पत्तीस येतें. तोंपर्यंत तें येत नाहीं. श्रीसमर्थांनीं परंपरागत विठ्ठल-भक्तीच्या ऐवजीं श्रीरामचंद्राची च कथा ब्रह्मांड भेदून पैलाड न्यावयास सांगितली ती कांहीं विशिष्ट हेतूंनीं प्रेरित होऊन च. केवळ ईश्वराच्या भजनीं लागलेल्या महाराष्ट्राचे हात तरवारीशीं जावेत व दुष्टांचें निर्दालन व्हावें हा च त्यांचा मानस होता. ही च गोष्ट श्री. देवांनीं आपल्या निरनिराळ्या प्रस्तावनांतून जसा जसा प्रसंग सांपडेल तशी तशी सांगितली आहे.

## आधुनिक भगीरथ

श्री. देव यांचा हा तीन तपांवरचा व्यासंग व 'रामदास रामदासी' मासिकाचीं हीं पंचवीस वर्षे पाहिलीं म्हणजे हा गंगौघ, त्याचें खरें अंतरंग दर्शवून महाराष्ट्रभूमीवर उतरवून देणारे श्री. देव म्हणजे आधुनिक भगीरथ च नव्हेत काय, असें मनांत येतें. संशोधन कार्यांत काय काय विपत्ति येतात व माणसाला किती अवधानें पाळावीं लागतात ह्याविषयीं 'रामदासी संशोधनां' त त्यांनीं केलेल्या खुलाशावरून माझ्या म्हणण्याचा आशय स्पष्ट होईल, असें वाटतें. धुळ्याच्या समर्थवाग्देवतामंदिरांत त्यांनीं अडकवून टाकलेली ती प्रचंड ज्ञानगंगा पाहिली म्हणजे मन क्षणभर स्तिमित होतें व आपल्यासारख्या पामराला तींत निमज्जन करतां येईल कीं नाहीं, चार दोन हात मारून पोहतां येईल कीं नाहीं ह्या विषयीं संदेह उत्पन्न होतो. पण ती गंगामाई च असल्यामुळें तें शक्य आहे — पण केवढें अथांग पात्र तें! ज्यांनीं भगीरथ परिश्रमांनीं हा एवढा सांठा जमविला त्यांचे प्रयत्न किती अमोल असतील याचा कोणी कधीं विचार केला आहे काय? मी तर म्हणतो कीं, आपल्या साऱ्या जीविताचा स्नेह ओतून आणि सततोद्योगाची वात लावून श्री. देवांनीं समर्थवाग्देवतामंदिरांत एक नवीन तेजोवलय उत्पन्न केलें आहे!

## रामदास आणि रामदासी मासिक

प्रस्तुत मासिक श्री. देव यांनीं काढलें व वाढविलें. रामदासी मासिकाचा पहिला अंक निघाला १८३७ च्या ज्येष्ठ शुद्ध १३ ला. या पंचवीस वर्षांत रामदासी मासिकाच्या अठरा वर्षांचे १८ × १२ = २१६ अंक निघाले. या मासिकांतून

प्रसिद्धलेलें वाङ्मय सूक्ष्मरीतीनें अवलोकन केलें तर त्यांत अजून अशीं कित्येक स्थळें दिसतात कीं, ज्यावर नीट प्रकाश पाडणें इष्ट आहे. याचा आशय हा कीं, संशोधनास अजून पुष्कळ वाव आहे. 'श्रीरामदासींचीं ऐतिहासिक टिपणें', 'श्रीरामदासींचीं ऐतिहासिक कागदपत्रें', 'श्रीरामदासपंचकमसार', 'श्रीसांप्रदायिक विविध विषय' खंड १, २, ३, ४, "श्री संप्रदायाचीं कागदपत्रें", इत्यादि अनेकविध सामग्रीच्या साहाय्यानें श्रीसमर्थांच्या कालाकडे व कार्याकडे पाहतां येईल. हें साहित्य पुरविण्याचें महनीय कार्य ह्या च मासिकानें केलें आहे. त्याचा नीट परामर्ष मात्र व्हावयास हवा आहे.

## नम्र सूचना

धुळें हें शहर जरा बाजूला असलें तरी श्रीसमर्थ-वाग्देवता-मंदिर व राजवाडे-संशोधन-मंदिर ह्या ऐतिहासिक संस्थांनीं तें आतां तरी सर्वांस निकट आलें आहे. आतां महाराष्ट्रांतील इतिहास व वाङ्मय यांचा विचार करणाऱ्या जिज्ञासूंस धुळ्याच्या गाडींतून येऊन धुळ्यास उतरणें प्राप्त आहे! तेव्हां ह्या मंदिरांनीं पुनीत झालेल्या ह्या सरस्वतीच्या पवित्र क्षेत्रांत चार होतकरु संशोधकांनीं येऊन संशोधन कार्य करावें – श्री. देव यांच्या सल्यानें करावें – ह्या गोष्टीस युनिव्हर्सिटीची मान्यता मिळावयास हवी आहे. तसा प्रयत्न जरूर व्हावा अशी माझी हार्दिक इच्छा आहे आणि श्रीसमर्थवाग्देवतामंदिराच्या विश्वस्तमंडळांतील मोठमोठी वजनदार मंडळी पाहिली म्हणजे ह्या आशा सफल होतील असें वाटतें.

श्री. नानासाहेब देवांनीं जमविलेली वाङ्मयीन सामग्री म्हणजे त्यांनीं मुंगीच्या श्रमानें खटपटून व जपून ठेविलेलें अमोल मौक्तिक भाण्डार आहे व 'रामदास रामदासी मासिक' हें त्याचें माहितीपत्रक आहे. आपल्या भाण्डारांतील प्रत्येक मोत्यांबद्दल जें जें म्हणून वक्तव्य करावयाचें होतें तें तें श्री. देव यांनीं केलें आहे, करीत आहेत व करतील. त्यांचा अधिकार फार मोठा आहे. त्यांनीं ओंवलेल्या मोत्यांच्या मालिका सरस्वतीच्या कंठांत खरोखर च उठावदार दिसत आहेत. त्यांतील मोती विटके नाहींत, तर सततोद्योगपूर्वक तावून सुलाखून जमविलेले ते पाणीदार, टपोरे, चिरंजीव व घेरेदार असे आहेत. त्यांचें तेज महाराष्ट्राला दिसत नसल्यास आपण अजून फार खोल गर्तेत आहोंत अगर आमच्या भाग्याचा दिवस अजून फार दूरवर आहे हें च खरें. अदम्यवृत्तीची अखंडित परंपरा आपण अखिल हिंदुस्थानांत टिकविली आहे. समर्थवाङ्मय म्हणजे आपला वेद आहे, देव आहे! या 'समर्थ' वाङ्मयाकडे जास्त लक्ष देण्यांत महाराष्ट्राचें 'कल्याण' आहे.

( ३ )

श्री

# श्रीसमर्थ आणि गोरक्षनाथ

( लेखक-रा. त्रिंबक रामकृष्ण गद्रे,

बी. ए., एल्‌एल्. बी., वकील, अकोला )

**परिच्छेदांचे मथळे:**—( १ ) गोरक्षनाथांचा शोध, ( २ ) गोरक्षनाथांची कृपा, ( ३ ) गुप्तपंथाचें रहस्य, ( ४ ) नाथपंथानें लावलेला मळा, ( ५ ) नाथांचें कार्यक्षेत्र व योगविद्या, ( ६ ) ' सोई गोरख होये, ' ( ७ ) श्रीसमर्थांचें सीमोल्लंघन, ( ८ ) श्री समर्थांचा उत्तरभारतांत संचार, ( ९ ) विलक्षण साम्य, ( १० ) श्रीसमर्थांचें वैशिष्ट्य, व ( ११ ) उभयतांच्या कार्याची फलश्रुति.

एकं हि सत् विप्रा बहुधा वदन्ति ।

—श्रुति

*The Nathas are extremely hard to get hold of.*

-Farquhar: Outline of Religious Literature of India p. 192

*Gorakhnath was a noted yogi ... ... and founded his sect about A. D. 1200*-ibid p. 254

## ( १ ) गोरक्षनाथांचा शोध

श्री समर्थ रामदास यांच्या चरित्राच्या व सारस्वताच्या आधारें नवनाथांतील एक प्रसिद्ध सत्पुरुष गोरक्षनाथ यांच्या अवतारकृत्याचा शोध घ्यावयाचा यत्न करावयाचा आहे. बाराव्या शतकांत नवनाथांनीं व विशेषेकरून गोरक्षनाथांनीं आरंभिलेल्या कार्याची परिणति भरतखंडांत कशी झाली हें पहावयाचें आहे. शिवसमर्थांची महाराष्ट्रांतील कामगिरी म्हणजे नाथांच्या धर्मस्थापनेच्या कार्याचें च

एक मधुर फल आहे असें किलेक विद्वानांचें म्हणणें आहे. या विषयाची येथें केवळ अनुमानात्मक चर्चा केली जाणार आहे. त्या संबंधाची मुद्देसूद व अधीव चर्चा तज्ज्ञांनी करावयाची आहे.

## ( २ ) गोरक्षनाथांची कृपा

श्रीसमर्थांवर गोरक्षनाथांची कृपादृष्टि होती अशी कल्पना त्यांच्या शिष्य महंतांत हि होती. शिरगांव मठाचे अधिपति भीमस्वामीकृत भक्तलीलामृतांत श्रीसमर्थांचें अभंगात्मक चरित्र गाइलेलें आहे. सदर चरित्रांतील पांचवा अभंग आमच्या ह्या विधानाला आधारभूत आहे असें दिसून येईल. तो अभंग असा:—

॥ श्रीराम ॥

जनस्थानीं पंचवटीं तपोवनीं ।
तप केलें वर्णी कोण त्याचें ॥ १ ॥
बारा वर्षे होतां तेथोनि निघाले ।
उत्तरे चालिले तीर्थ यात्रे ॥ २ ॥
सर्व तीर्थें करुनी बद्रीकाश्रमासी ।
दुर्घट मार्गासी पाहाते जाले ॥ ३ ॥
सीत बहुत पडे मार्ग न चालवे ।
चिंतितां राघवें भेटी दिल्ही ॥ ४ ॥
हुर्मुजी वस्त्राची मेखळा गळ्यांत ।
घालितांची सीत निवारलें ॥ ५ ॥
परीव्राड नामें जाण हो संन्यास ।
नाम रामदास अजीहूनी ॥ ६ ॥
पुढें जातां मार्गी कांहीं वाटे भया ।
तेथें दत्तात्रेया भेटी जाली ॥ ७ ॥
मणका येक त्यांनीं बांधिला पायास ।
भयातीत असे अरण्यांत ॥ ८ ॥
मनीं आले कांहीं हत्यार असावें ।
गोरक्ष स्वभावें आले तेथें ॥ ९ ॥

तीरकमटा त्यांनीं दिधला हातांत ।
ऐसी मार्गांआंत चिन्हें जालीं ॥ १० ॥
पांचवे अभंगीं कथा जाली ऐसी ।
आवडी भीमासी संतपाईं ॥ ११ ॥

याच "भक्तलीलामृत" ग्रंथांत "मच्छेंद्रनाथ" यांचें हि चरित्र दिलें आहे. हे गोरक्षनाथांचे गुरु होते. गुरुभक्तीसाठीं गोरक्षांनीं आपला डोळा अर्पण करून दहीवडा आणला अशी मोठी मार्मिक कथा त्यांत दिली आहे.

## ( ३ ) गुप्तपंथाचें रहस्य

श्रीसमर्थांच्या "करुणाष्टकां" त गुप्तपंथ* या सदराखालीं सहा श्लोक आहेत. त्यांपैकीं दोन श्लोकांतील "अलक्ष" व "गुप्त होये त्या न होय जन्ममृत्य यातना" या खुणेच्या शब्दाचा व वाक्याचा अर्थ पाहिला, तर या ओळी रचितांना कवीच्या मनांत नाथपंथांतील सिद्धांविषयीं च विचार घोळत असले पाहिजेत हें लक्षांत येण्यासारखें आहे, "अलक्ष" व "आदेश" हे दोन प्रश्नोत्तरार्थक शब्द नाथपंथांत अत्यंत महत्त्वाचे आहेत. "आलख" "अलख" हे शब्द "अलक्ष" याचेच हिंदी रूपांतर. नाथांची कालवंचिनी विद्या हिचा निर्देश "गुप्त होये त्या न होय जन्ममृत्ययातना" या वाक्यांत समर्थांनीं केलेला आहे असा तर्क कां करूं नये ? नाथसिद्धांनीं व विशेषेंकरून गोरक्षनाथांनीं–ज्यांना लौकिक भाषेंत "गोरखनाथ" असें संबोधितात – अकराव्या व बाराव्या शतकांत योगविद्येच्या बलावर मृत्यु व वार्धक्य यांवर विजय मिळवून अमृतत्व संपादन करण्याची विद्या हस्तगत केली होती व ही विद्या त्यांनीं आपल्या शिष्यांच्या द्वारें अखिल हिंदुस्थानांत प्रसृत केली. हा च नाथांचा गुप्तपंथ.

## ( ४ ) नाथपंथानें लावलेला मळा

या नाथपंथीयांनीं पेरलेल्या विद्याबीजाला भारतवर्षांत उत्तम पीक आलें. सकल संतांच्या आरतीची रचना पाहिली तरी हि हें च दिसून येईल. या आरतींत श्रीसमर्थांनीं "नाथ गोपिचंद" यांच्यापासून प्रारंभ करून पांच सहाशें वर्षांतील सर्व भारतीय संतांचा उल्लेख केला आहे. हे सर्व संत भक्ति व योग या दोन्ही मार्गांचा उत्कृष्ट मिलाफ घालणारे होते. या संतांचा तपशीलवार उल्लेख रामदासी

---

* गुरु संत गुप्त पंथ तो अनंत पाविजे । हृदयमूळ सानकूळ भावनेसि भाविजे । देव दक्ष तो अलक्ष त्यास लक्ष लाविजे । तत्व सार वेदनें निवेदनें चि पाविजे ॥१५५–४
गुप्त होये त्या न होय जन्ममृत्ययातना । ज्ञान गुप्त तो अलिप्त वेगळा चि या जना । अंतरें चि वोळरे सोन हीं उपासना । भक्तराज मुक्त काज काये कर्म कामना ॥५॥

महंत गिरिधर यांनीं आपल्या " श्रीसमर्थप्रताप " ग्रंथांत केला आहे. " प्रताप " च्या सोळाव्या व सतराव्या समासांत " महापुरुष भोजनें " व " दुसरी पंगति " यांत या संतांचा व त्यांच्या कार्यांचा उल्लेख आहे. यांत सुमारे दीडशे संतांचीं नांवें आहेत. नाथपंथापैकीं पुढील प्रमुख सिद्धांचा उल्लेख ज्यांत आहे त्या ओव्या आम्ही येथें उद्धृत करतों:—

मुकुंदराज विवेकसिंधुरस सेविती ।
हरिनाथ मांडीवरी श्रीपद गुळोरी दाविती । १६-२३
मछिंद्र मीन गोरक्षें ब्रह्मरस सेविले ।
चौरंगी गैनि पंगतिकार दाटले ।
निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाईसीं जेविले ।
अपार ब्रह्मरस येक पांति ॥ २४ ॥
जालंधर गोपीचंद मैनावती ।
नाना योगमार्गें ब्रह्मरस सेविती ।
तिघे जणे वैसुनियां येक पांति ।
कानीपासी बोलाविती गोरक्षीकरवी ॥ २५ ॥

## ( ५ ) नाथांचें कार्यक्षेत्र व योगविद्या

गोरक्षनाथांचें कार्यक्षेत्र हिमालय, पंचनद व महाराष्ट्र इतकें विस्तृत होतें. नाशिक जवळच्या सप्तशृंग व त्रिंबकेश्वर नजीकच्या ब्रह्मगिरी या ठिकाणीं त्यांनीं इतर प्रमुख नाथांप्रमाणें तपश्चर्या केली होती. त्यांचे मुख्य शिष्य गैनीनाथ यांच्या तपश्चर्येचें स्थान या ब्रह्मगिरीवर अद्यापि दाखविलें जातें. गैनीनाथांनीं निवृत्तिनाथांना उपदेश करून त्यांच्या द्वारा महाराष्ट्रांत भागवतसांप्रदायाची उभारणी केली. निवृत्तींचे धाकटे बंधु ज्ञानेश्वर यांनीं भागवतसांप्रदायाचा आधारभूत ग्रंथ " ज्ञानेश्वरी " ह्या भगवद्गीतेवरील टीकात्मक ग्रंथाची रचना केली. ज्ञानेश्वर नामदेवादि संत मंडळांत वृद्ध गोरक्षनाथ यांच्याबद्दल अत्यंत आदर होता व तत्कालीन महाराष्ट्रीय संतांना त्यांचा जातीनें परिचय होता. गोरोबा व गोरक्षनाथ एक च होत असा हि सरदार मिरीकर आदि विद्वानांचा तर्क आहे; असो. नाशिक पंचवटी येथें श्री समर्थांनीं बारा वर्षे पुरश्चरण, तपश्चर्या व विद्याभ्यास केला. ब्रह्मगिरी व सप्तशृंग येथील नाथसिद्धांच्या अवतारकृत्याची श्रीसमर्थांना नाशिक पंचवटी येथें असतांना ओळख अवश्य झाली असली पाहिजे. बारा वर्षांतून एकदा भरणाऱ्या कुंभमेळ्याच्या प्रसंगीं सर्व भारतवर्षांतून लाखो साधुसंत नाशिक

त्र्यंबकेश्वरीं येतात. त्याचें आकर्षण या नाथसिद्धांच्यामुळें आहे हें श्रीसमर्थांच्या लक्षांत आलें नसेल असें नाहीं. उलट या पंथांतील सिद्धांच्या चरित्राचा व कार्याचा परिचय त्यांनी करून घेतला असला पाहिजे, असें अनुमान काढतां येईल. स्वतः श्रीसमर्थ हे हि गोरक्षनाथांप्रमाणें योगीराज होते. मिरज येथील यवन सुभेदाराला त्यांनी आपल्या योगसामर्थ्याची प्रचिती आणून दिल्याची एक गोष्ट त्यांच्या बखरींत नमूद आहे. पन्हाळगडावर हि असा एक चमत्कार झाल्याचें सांगतात. " प्रतापी " तील पुढील ओवी पहा:—

> पराशर पर्वतीं विचित्र वर्तलें ।
> ( समर्थांनीं ) केलें संध्यावंदन । ३–५०
> पुढें अमात्यसदनीं जालें कथानुकीर्तन ।
> कथासमाप्तीं समर्थें केलें उड्डाण ।
> पर्वता वरूनि स्वानंदें ॥ ३–५२

नाथसंप्रदायाच्या निकट परिचयामुळें समर्थसंप्रदायांतल्या अधिकारी महंतांच्या मनावर कसा परिणाम झाला होता हें दाखविण्यासाठीं आम्ही गिरिधराचें महंत वेणाबाईवरचें पुढील पद येथें उतरून घेतों:—

> देह माझें मन माझें । सर्व नेलें गुरुराजें ॥ १ ॥
> आम्ही गुरुनाथपंथी । ज्ञानमुद्रा दिधली हातीं ॥ ध्रु० ॥
> कर्णी घातली नाममुद्रा । " मुद्री " अगोचरी मुद्रा ॥ २ ॥
> कान फाडुनि जोगी जालों । संतदर्शनासी आलों ॥ ३ ॥
> वेणीस्वामीचें दर्शन । माया संपेत निरंजन ॥ ४ ॥

श्रीसमर्थांप्रमाणें त्यांच्या शिष्यांनी हि योगविद्येंत किती अधिकारसंपन्न असत त्याचा उत्कट पुरावा म्हणून आंबेजोगाईचें सुप्रसिद्ध पद " मी सद्गुरुवरची सैरी जोगते बरी " या प्रकारें अंगुलिनिर्देश करतां येईल.

## ( ६ ) " सोई गोरख होये "

श्रीसमर्थांनी " मानपंचक " या आपल्या ग्रंथांत नाथपंथाची त्यांच्या वेळीं किती भिकार अवस्था झाली होती याचें मोठें मार्मिक वर्णन केलें आहे. या पदांत गोरक्षनाथांसंबंधानें त्यांची काय भावना होती हें हि दिसून येतें.

> आदेश लागे आदेश आदेश सब फेड़ु परे ।

आलेख आलेख सो न्यारा जैसी विहिणी वैसी रहणी ।
सोई नायका प्यारा ॥ आलेख जागे ॥ १ ॥

\+ + +

गोरख गोरख सब कोहु कहे गोरख न बुजे कोहे ।
जोगींद्रकु जो कोई रखे सोई गोरख होये ॥ ३ ॥

\+ + +

मुद्रा फारी कानमो डारी । आपसे न फारी कोये ।
आपसे फोर मुद्रा पैटी सोई गोरख होय ॥ ९ ॥

( श्रीसमर्थांचा गाथा पृ. २६८ )

श्रीसमर्थांची गोरक्षनाथांविषयीं किती पूज्य भावना होती हें श्रीमत् दासबोधांतील खालील ओव्यांवरून समजण्या सारखे आहे:—

असो पूर्वी थोर थोर । जेणें ज्ञानें पैलपार ।
पावले ते साचार । ऐक आतां ॥ ५–६–२२
व्यास वसिष्ठ माहामुनी । शुक नारद समाधानी ।
जनकादिक महांज्ञानी । येणें चि ज्ञानें ॥ २३ ॥
वामदेवादिक योगेश्वर । वाल्मीक अत्रि ऋषेश्वर ।
शौनिकादि अध्यात्मसार । वेदांतमतें ॥ २४ ॥
सनकादिक मुख्य करूनी । आदिनाथ मीन गोरक्षमुनी ।
आणीक बोलतां वचनीं । अगाध असती ॥ २५ ॥

इतकेंच नव्हे तर आपल्या शिष्य महंतांना "भीक्षे" ची दीक्षा देतांना प्रत्यक्ष "दत्त" व "गोरक्ष" यांचा च आदर्श म्हणून आपल्या अनुयायांसमोर ठेवला होता हें पुढील ओवीवरून दिसेल.

दत्त गोरक्ष आदिकरुनी । सिद्ध भिक्षा मागती जनीं ।
निस्पृहता भिक्षे पासुनी । प्रगट होये ॥ १४–२–५

तसेंच ज्ञानमार्गाचा संदेश देणारी अवधूत गीता श्रीसमर्थांनीं अभ्यासिली होती व ती त्यांच्या "स्वाध्यायांत" अत्यंत महत्वाचा ग्रंथ म्हणून मानली गेली होती. ही अवधूतगीता अवधूतांनीं म्हणजे दत्तांनीं गोरक्षांस सांगितली होती.

अवधूतगीता केली । गोरक्षीस निरोपिली ।
ते अवधूतगीता बोलिली । ज्ञानमार्गे ॥ ७–७–३४

श्रीसमर्थांनीं आपल्या दासबोधाच्या आधाराला घेतलेल्या संदर्भग्रंथांच्या यादींत- अवधूतगीतेचा उल्लेख केला आहे. ( १-१-१८ )

## ( ७ ) श्रीसमर्थांचें सीमोल्लंघन

नाशीकपंचवटींत बारा वर्षे पुरश्चरण व विद्याध्ययन केल्यानंतर आणि शहाजी राजांच्या भेटीनंतर त्यांनीं जनस्थानाच्या पंचक्रोशीचें सीमोल्लंघन केलें, त्या वेळीं त्यांची मनोभूमिका कशी असेल हें आतांपर्यंतच्या विवेचनावरून कळून येईल. केवळ राजकारणासाठीं त्यांचें परिभ्रमण नव्हतें. श्री रामचंद्राच्या प्रेरणेनुसार भरतखंडांत गेल्या पांचसहाशें वर्षांत झालेल्या धर्म व समाजक्रांतीचें अवलोकन करून आणि पूर्वीच्या संतांच्या कामगिरीचा परिचय करून घेऊन, आपल्या भावी धार्मिक व राष्ट्रीय कार्याची दिशा आणि रूपरेखा त्यांना निश्चित करावयाची होती. " महाराष्ट्रधर्म वाढवावा " हें वाक्य काय दर्शवितें बरें ?

## ( ८ ) श्रीसमर्थांचा उत्तर भारतांत संचार

श्रीसमर्थांनीं शके १५५४ च्या सुमारास जनस्थान सोडून माहूर, कारंजा, अकोला, चारी, अंजनगांव, एलिचपूर या मार्गानें बैतुलजवळ खेडला किल्ल्याच्या पायथ्याशीं श्रीमुकुंदराज यांच्या समाधीजवळ कांहीं दिवस निवास केला असावा असें अनुमान आह्मी आमच्या " श्री समर्थांचा सातपुड्यांतील संचार " या निबंधांत केलें आहे. श्रीसमर्थांच्या या तपश्चर्येचें स्थान बैतुलजवळ " शिंगणवाडी " म्हणून प्रसिद्ध आहे. या ठिकाणीं तपश्चर्या करीत असतां एक प्रचंड व्याघ्र त्यांच्या दर्शनास येत असे व कित्येक प्रहर त्यांच्या संनिध बसत असे अशी एक कथा सांगतात. हें सृष्टिसौंदर्यानें सुभूषित रम्य स्थान आह्मी नुकतेंच अवलोकिलें आहे. ( ता. २ डिसेंबर १९३९ ) मत्स्येंद्रनाथांच्या संबंधानें हि अशी च एक आख्यायिका सांगण्यांत येते; असो. मुकुंदराज हे नाथ सांप्रदायांपैकीं च. आदिनाथ–हरिनाथ–रघुनाथ–मुकुंदनाथ उर्फ मुकुंदराज अशी ही एक स्वतंत्र नाथाची परंपरा आहे. मुकुंदराजांच्या विवेकसिंधु, परमामृत आदि ग्रंथांचा समर्थांच्या भाषेवर व विचारांवर परिणाम झाला असावा असा प्रो. पोतदार प्रभृति विशेष विद्वानांचा तर्क आहे. बैतुलहून छिंदवाडा, भंडारा, राजीम, अमरकंटक, चित्रकूट, प्रयाग, गंगासागर, गया करीत वाराणशी येथें श्रीसमर्थ येऊन दाखल झाले. वाराणशीहून त्यांनीं हिमालयांतील यात्रेला आरंभ केला. नेपाळांतल्या श्री पाशुपतनाथाचे व त्यांच्या आसमंतांतील

मत्स्येंद्रनाथांच्या व गोरक्षनाथांच्या स्थानांचें दर्शन त्यांनी अवश्य घेतलें असलें पाहिजे. नेपाळच्या त्यांच्या भेटीचा प्रसंग अद्याप अप्रसिद्ध आहे. परंतु त्यांच्या सर्व चरित्राचा परिचय आपल्याला अद्याप व्हावयाचा आहे. नेपाळांत बौद्धधर्माच्या जागीं हिंदुधर्माची स्थापना करण्याचें महत्कार्य प्रद्युम्नगिरीसप्तशृंगाकडले मत्स्येंद्र-गोरक्ष यांनी मोठ्या तडफेनें केलें होतें. गोरक्षनाथांना नेपाळांतील सर्व हिंदु जनता *श्रीपशुपतिनाथाचे अवतार मानूं लागली होती; व स्वतःला त्यांचे अनुयायी म्हणजे* " गोरखे " म्हणून घेण्यांत नेपाळची प्रजा अद्याप भूषण मानिते. संयुक्त प्रांतांतील ( यू. पी. ) गोरखपूर येथील गोरक्षनाथांच्या मंदिराचें दर्शन घेण्यासाठीं आज हि हजारो नेपाळी गुरखे प्रतिवर्षी येत असतात; असो. हिमालयांतील इतर दुसऱ्या स्थानांना समर्थांनीं भेट दिल्याचा मात्र उल्लेख सांपडतो. भागीरथ गंगातीरीं हनुमंत घाटावर मारुतीची स्थापना केल्यावर ते कांहीं दिवस अयोध्येला राहिले व तेथून हिमालयांतील नेपाळची यात्रा अत्यंत गुप्तपणें करून ते बद्रीनाथास गेले. त्यांनीं हिमालयांत ठिकठिकाणीं मारुतीची स्थापना केली. सिमल्याजवळच्या त्यांनीं स्थापिलेल्या मारुतीचा शोध कांहीं वर्षांपूर्वी औंधचे राष्ट्राचे श्रीमंत भवानराव पंत प्रतिनिधि राजेसाहेब यांनीं केला, हें वाचकांच्या स्मरणांत असेल. बद्रिकेदारहून समर्थ श्रीनगरास गेले व तेथें त्यांचा नानकपंथीयांशीं परिचय झाला. हिमालयांत समर्थांनीं श्रीवेत मारुती या स्थानाला भेट दिली. उत्तर भारताच्या संचारांत तुलसीदासांची रामोपासना आणि कबीरांचा व रामानंदांचा सांप्रदाय यांचा विशेष परिचय समर्थांना झाला. या तीन हि सांप्रदायांच्या पूर्वी मत्स्येंद्र-गोरक्षांचा नाथपंथ होऊन गेला व उत्तर *हिंदुस्थानांतील सर्व मध्यकालीन हिंदुसंप्रदायांचा* उगम नाथपंथांत आहे, या दोन बाबी श्रीसमर्थांच्या लक्षांत आल्याशिवाय कशा राहिल्या असतील? जालंधर-गोपीचंद या नाथशाखेच्या कार्यावर पुढें श्री चैतन्यांनीं बंगाल प्रांतांत आपल्या कार्याचा विस्तार केला हे हि त्यांनीं पाहिलें असावें. गोरक्षनाथ व कबीर यांच्या उपदेशाचा परिणाम शीखपंथाचे संस्थापक गुरु नानक यांच्यावर झाला होता, असा कनिंगहॅम आदि पाश्चात्य इतिहासलेखकांचा तर्क आहे. उत्तर भारताच्या यात्रेनंतर श्रीसमर्थ द्वारका, काठियावाड, कच्छ व गुजराथ या प्रांतीं आले. गोरक्षनाथांना गुरुस्थानीं मानणारे धर्मनाथ यांनीं चौदाव्या शतकांत कच्छ येथील धीनोधार मठ व गिरिनार पर्वतावर मठ स्थापन केले होते. या मठांना समर्थांनीं भेट दिली असली पाहिजे. धर्मनाथांनीं नाथपंथाचा पुनरुज्जीवन कर-ण्याचा प्रयत्न केला. नाथपंथाला आजचें " कान फाटे " या नावानें ओळखलें जाणारे स्वरूप या वेळीं प्राप्त झालें. धर्मनाथांनीं सर्व भरतखंडांत नाथसंप्रदायाचे मठ स्थापून दिव्यमहंतांचा व्याप केला होता. या सर्व परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन करून श्रीसमर्थ शके १५६९-७० चे सुमारास सिंहस्थाचे पर्वणीस नाशकास आले.

## ( ९ ) विलक्षण साम्य

श्रीसमर्थांच्या व गोरक्षनाथांच्या चरित्रांत, उपदेशांत, व कामगिरींत विलक्षण साम्य दिसून येतें; त्याचें येथें थोडक्यांत विवेचन करूं या. दोघे हि आजन्म ब्रह्मचारी व दोघांना हि शरीरसामर्थ्य व योगसामर्थ्य उत्कटतेनें लाभलें होतें. वयाच्या बारा वर्षांनंतर दोघांनीं द्वादश वर्षपर्यंत तपश्चर्या, पुरश्चरण व विद्याध्ययन केलें. सर्व भरतखंडांत दोघांनीं संचार केला. दोघांच्या प्रयत्नानें शिष्यसंप्रदायाचा विस्तार झाला. उपदेशांत हि साम्य दिसून येतें. उदाहरणार्थ, दोघांचे "अजपा" प्रकरण पहा. गोरक्षनाथांचे "अजपा" विषयीं पुढे दिलेलें पद्य आढळतें:—

ऐसा जाप जपो मन लाई । सोऽहं सोऽहं अजपा गाई ॥
आसन दिढ करि धरो धियान । अहनिसि सुमिरों ब्रह्मगियान ॥
नासा अग्र निज ज्यों बाई । इडा प्यंगुला मधि समाई ॥
छसै सहंस इकीसौ जाप । अनहद उपजै आपै आप ॥
बंक नालिमै ऊगै सूर । रोम रोम धुनि बाजै तूर ॥
उलटै कमल सहस्रदल वास । भ्रमर गुफामै ज्योति प्रकास ॥

आतां श्रीसमर्थांचें "अजपा" प्रकरण पहा. त्यांच्या श्रीमत् दासबोधाच्या सत्राव्या दशकांतील पांचव्या समासांत या विषयाचें निरूपण आहे. हें झालें विचार साम्य. हिंदी भाषेंत दोघांनीं केलेलें काव्य पहा. गोरक्षनाथांना हिंदीचे आदिकवि म्हणतात* व त्यांची हिंदी भाषेंतील विपुल कविता उपलब्ध आहे. त्यांच्या कवितेची छाप श्रीसमर्थांच्या हिंदी कवितेवर हि पडलेली दिसते. दोघांच्या हिंदी कवितांचा तुलनात्मक विचार झाला तर आमचें म्हणणें सार्थ आहे हें दिसून येईल. असें साम्य त्यांच्या कामगिरींत हि प्रत्ययास येतें. देशी भाषांच्या द्वारा सर्व जनतेंत हिंदु धर्माचा संदेश, शिव विष्णु देवी व दत्त अशा निरनिराळ्या संप्रदायांच्या मार्फत किंवा कबीर व शीख अशा एकेश्वरी पंथाच्या साह्यानें नाथसिद्धांपासून एकनाथतुकारामादि सर्व साधुसंतांनी प्रसृत केला. याला नेपाळ, पंचनद ( पंजाब ), महाराष्ट्र, राजस्थान, महाकोसल इत्यादि प्रांतांत राष्ट्रीय स्वातंत्र्यरूपी फलाची प्राप्ति झाली असा तज्ज्ञांचा अभिप्राय आहे.

## ( १० ) श्रीसमर्थांचें वैशिष्ट्य

तथापि इतर संतांच्या व विशेषें करून गोरक्षनाथांच्या व श्रीसमर्थांच्या कामगिरींत थोडासा फरक आहे; व हें वैशिष्ट्य नजरेआड करून चालणार नाहीं.

---

* गोरक्षनाथांनी मराठींत हि काव्य केलें असून त्यांची मराठी कविता प्रसिद्ध होणें अत्यंत अवश्य आहे असें आम्हांस वाटतें.

धर्मस्थापनेला व धर्मस्थापनेच्या उद्योगाला राजाश्रय पाहिजे व त्यासाठीं स्वतंत्र हिंदुराष्ट्राची किंवा राज्याची स्थापना करण्याचा शिवसमर्थांनीं यशस्वी प्रयत्न केला. हा शिवसमर्थांचा संकल्प पूर्वींच्या संतांनीं आपल्या पुढें ठेवला नव्हता व असा त्यांनीं संकल्प कां केला नसावा त्याला सबळ कारणें हि आहेत. परंतु पांच शहायें वर्षांच्या कटु अनुभवानें अशा प्रकारच्या उद्योगाची आवश्यकता भासली व म्हणून शिवसमर्थांनीं एकमेकांना पूरक परंतु स्वतंत्रपणें राज्य व धर्मस्थापनेचें कार्य सुरु केलें असें इतिहास सांगतो.

## ( ११ ) उभयतांच्या कार्याची फलश्रुति

श्रीसमर्थांचा संप्रदाय व गोरक्षनाथांचा नाथपंथ यांची स्थापना वैदिकधर्माच्या पुनः संस्थापनेसाठीं झाली व श्री कुमारिलभट्ट व श्री शंकराचार्य यांनीं आठव्या व नवव्या शतकांत आरंभिलेलें कार्य या संप्रदायांनीं देशी भाषांच्या द्वारें पुढें चालविलें. बौद्ध, जैन, महानुभाव, लिंगायत, तसेच खिस्ती व इस्लाम या पंथांच्या सान्निध्यानें भारतीय बहुजन समाज वैदिक धर्माला पारखा होण्याच्या बेतांत आला होता. बहुसंख्य हिंदुसमाज हिंदुधर्मांत व संस्कृतींत सुरक्षित ठेवण्याचें अपूर्व व अलौकिक कार्य गोरक्षनाथांनीं व श्रीसमर्थांनीं सर्व भारतवर्षांत केलें. गोरखपुर, गिरनार, नेपाळ, ज्वालाजी, महाराष्ट्र इतक्या विस्तृत प्रादेशिक विभागांत गोरक्षनाथांचें कार्य झालेलें दिसतें. त्यांची विशेष कृपा नेपाळवर होती असें दिसून येतें. त्यांनीं योग व भक्ति यांचा प्रसार केला. नेपाळचें हिंदु राज्य, सीखांचें राज्य, तसेंच मराठ्यांचें साम्राज्य हीं सर्व गोरक्षनाथांच्या व श्रीसमर्थांच्या कार्याची फलश्रुति होय. अर्थात् महाराष्ट्रांतलें शिवसमर्थांचें कार्य विशेष उठावदार झालें, ही गोष्ट महाराष्ट्रीयांना अभिमानास्पद आहे. भावी कालासंबंधानें त्यामुळें आशेचा अंकुर फुटलेला वाटतो; असो. शेवटीं आम्ही उभय विभूतींना पुढील श्लोकद्वयांनीं नमन करून लेखणी बाजूला ठेवतोः—

शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें ।
वसिष्ठापरी ज्ञान अद्भूत साचें ।
कवि वाल्मिका सारखा मान्य ऐसा ।
नमस्कार माझा सद्गुरु रामदासा ॥

गुरुभक्ति जेथूनि रूपासी आली ।
महासिद्धि ज्या पासुनी व्यक्त झाली ।
कसा धांवण्या धांवतो दीन काजा ।
नमस्कार गोरक्षनाथासि माझा ॥

## परिशिष्ट

**आधारभूत व संदर्भ ग्रंथ** — ( १ ) श्रीमत् दासबोध, ( २ ) श्रीसमर्थांचीं दोन जुनीं चरित्रें, ( ३ ) करुणाष्टकें, ( ४ ) श्रीसमर्थप्रताप, ( ५ ) पहिला सुमनहार, व ( ६ ) तिसरा सुमनहार, हे सत्कार्योत्तेजक सभेचे सहा ग्रंथ, आणि ( ७ ) ज्ञानेश्वर दर्शन, भाग पहिला – नगर, ( ८ ) श्रीसमर्थ रामदास स्वामी – केळकर, ( ९ ) श्रीज्ञानेश्वर 'महाराज – पांगारकर, ( १० ) 'मराठी वाङ्मयाचा इतिहास,' पहिला खंड, – पांगारकर, ( ११ ) 'कल्याण' या हिंदी मासिकाचा "योगांक", ( १२ ) सीखांचा इतिहास, इंग्रजी – कनिंगहॅम, ( १३ ) मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, – चित्रशाळा, पुणें – रावसाहेब न्या. मू. माधवराव रानडे यांच्या Rise of the Maratha Power चें मराठी रूपांतर, ( १४ ) श्रीसमर्थांचा गाथा – अनंतदास रामदासी, ( १५ ) हिंदुधर्माची पुनर्घटना, सर राधाकृष्ण यांच्या Hindu view of Life या इंग्रजी पुस्तकाचें बाळुभाई मेहता यांनीं केलेलें मराठी रूपांतर, ( १६ ) नवनाथ भक्तिसार – पोथी, ( १७ ) An outline of the Religious Literature of India by J. N. Farquhar, M. A., D. Litt. ( oxen ). — इत्यादि

अकोला – १८६१ श्रीरामदासनवमी, ता. २ मार्च १९४०



## ( ४ )

# शिवाजीच्या राज्यघटनेचें आद्यसूत्र

( लेखक–प्रो. त्र्यंबक शंकर शेजवलकर, एम्. ए., पुणें )

प्रत्येक स्वतंत्र राज्याचीं कायम अशीं कांहीं धोरणें असतात. तीं सोडून त्यास आपलें स्वतंत्र अस्तित्वच टिकवतां येणार नाहीं. तसेंच प्रत्येक चिरकाल टिकणाऱ्या राज्यास कांहींतरी नैतिक पाया कीं जो राज्याच्या अस्तित्वाचें च नैतिक अधिकारण जें प्रजारंजन त्याला कायम पोषक होईल–असा असावा लागतो. मोंगलबादशाही एका दृष्टीनें परकी ना, पण तिचें हि एक नैतिककारण–व तेंच तिचें धोरण–होतें. अखिल भारतवर्षांत सत्ताशों उपन्न लहानमोठे संस्थानिक जिवंत राहून त्यांनीं सतत आपसांत झगडत रहावें, प्रजेची सारखी पायमल्ली करावी, अनेक करांनीं प्रजेस नाडावें, सर्वच व्यवहार अडचणीचा करावा, सार्वत्रिक हिताचीं कामें हातांत घेण्यास दौर्बल्यामुळें नेहमीं च असमर्थ रहावें, सांस्कृतिक वाटीस अवसर च न ठेवावा, अशा स्थितीपेक्षा एक च राज्य आसेतु–हिमाचल असावें; त्यांतील राज्यपद्धति एकसारखी असावी; राज्याची भाषा, कालमापन, नाणीं, वजनें, एक असावींत; बऱ्याच प्रजाविभागानें सतत परचक्राच्या भयांत राहाण्यापेक्षां कायम शांतता अंततस्ततः तरी नांदावी, हें इष्ट नव्हतें काय? हा हेतु बऱ्याच अंशांनीं मोंगल बादशाहीनें साधला आणि म्हणून च ती चिरस्मरणीय ठरली. आर्यावर्तांत एक चक्रवर्ती असावा अशी कल्पना रूढ होती तरी हिंदु राजवटींत ती मूर्तावस्थेंत क्वचित च उतरलेली दिसते. अशोकानंतर अकबर औरंगजेब च कायते बऱ्याच भागाचे चक्रवर्ती झालेले दिसतात. या बादशाहींत हिंदूंचा उत्कर्ष साधता तर कदाचित् हिंदु छत्रपतीची गरजच वाटली नसती. पण अकबर व दारा यांचें धोरण सुटून शहाजहान औरंगजेबाचें च पुढें आलें म्हणून शिवाजीची आवश्यकता उत्पन्न झाली. बहुसंख्य हिंदूंची संस्कृति नेहमींच राज्यकर्त्यांच्या लहरीप्रमाणें वर खालीं होत रहावी, तिचें अस्तित्व सुद्धां सदा संशयांत असावें, राज्यकर्त्यांच्या वागणुकीचा कायम परिणाम अंतीं मुसलमानांची संख्या वाढत जाऊन हिंदूंचा संकोच सारखा होत रहावा, ही स्थिति पालटण्यासाठीं हिंदु गोब्राह्मणप्रतिपालक छत्रपतीची चक्रवर्ती संस्था जन्मास आली.

ही संस्था आरंभीं तरी एक कल्पना च होती. पुरा महाराष्ट्रहि ज्याच्या हातीं नाहीं त्यानें छत्रपति हें पद धारण करावें हें चमत्कारिक नव्हे काय? पण राज्याभिषेकाच्या मागची कल्पनाच अशी प्रभावी होती कीं तिनें मरून पडलेल्यांना चेतना आणावी, चेतना असणारांना स्फूर्ति द्यावी, स्फूर्ति असणाऱ्यांच्या अंगांत शक्ति भरावी, शक्तिमानांच्या हातून पराक्रम घडावा आणि अशा रीतीनें कल्पनेला मूर्त स्वरूप आपोआप प्राप्त व्हावें. कल्पनांचा जोर जगाच्या इतिहासांत अनेकवार मुद्रित झालेला आहे. विख्यात इतिहासविवेचक ब्राइस याचा " पवित्र रोमचें साम्राज्य " हा ग्रंथ ज्यांनीं अभ्यासिला असेल, त्यांना अशीच एका छत्रपतीची कल्पना यूरोपांत दोन हजार वर्षे कशी प्रभावी ठरली याचें वर्णन सांपडेल. मुसल्मानांचे खलिफा, चीनचे चक्रवर्ती, जपानचे सम्राट, हे सर्व विशिष्ट कल्पनांचीं दृश्य स्वरूपें आहेत. सर्व पृथ्वीवर मुसलमानांचा असा एकच खलिफा असावा, निरनिराळ्या देशांतील सत्ताधीश त्याचे हस्तक असावे, इतरांशीं वागतांना सर्व मुसल्मानांची एक च राजनीति असावी, अशी कल्पना खलिफांच्या संस्थेंत होती. त्यास अनुसरून च एका काळीं सिंधुनदीपासून अटलांटिक महासागरापर्यंतच्या प्रदेशांत एका खलिफाचें राजशासन चालत होतें, म्हणून च मुसल्मानी संस्कृतीचा प्रसार या भागांत झाला. या कल्पनेचा धागा गेल्या महायुद्धापर्यंत तुर्कस्थानच्या राज्याशीं निगडीत होता. मध्ययुगांत ही कल्पना हिंदुस्थानांतहि रूढ होती. म्हणून च एका मराठी बखरकारानें सदाशिवरावभाऊची महत्त्वाकांक्षा रूमशाम जिंकण्याची होती, असें म्हटलें आहे. चिनी सम्राट स्वतःला जगांतील एकमेव श्रम सत्ताधीश मानीत. जे देश चीनच्या प्रत्यक्ष राज्यांत नव्हते ते सुद्धां तत्त्वतः त्यांत सामील आहेत च अशा रीतीनें ते व्यवहारांत वागत असत. स्वतंत्र यूरोपियन व्यापारी कांहीं बंदरें मागण्यासाठीं चिनी बादशहाकडे गेले. तेव्हां त्यांच्या अर्जास उत्तर देतांना जें बादशाही फर्मान निघालें, त्यांत हे आपले दूरचे प्रजाजन आहेत अशी घोषणा केली होती. हा प्रकार या गोऱ्यांस विस्मयकारक झाला! फार काय, या गोऱ्यांनीं बंदरें आरमारी बळावर जिंकून ताब्यांत घेतलीं, तरी त्यांवरील हक्क त्यांस सुपूर्द करतांना हि बादशाही भाषा तशी च! मोंगल बादशहांनीं अखिल हिंदुस्थानांत अशी च कल्पना स्वतःबद्दल रूढ केली होती. केवढा हि लहानमोठा संस्थानिक वा स्वतंत्र राजा असो, त्याचें राज्य कोठल्या ना कोठल्या मोगली सुभ्याच्या हिशेबांत सामील असावयाचें! औरंगजेबानें विजापूर आणि गोवळकोंडा काबीज केलीं नव्हतीं, तेव्हां सुद्धां तीं राज्यें मोंगलांच्या बेवीस सुभ्यांत सामील! पेशवाईच्या अखेरपर्यंत ही कल्पना रूढ होती. ह्या कल्पनेचा आरंभ ऐने अकबरीपासून आढळतो. मराठ्यांचें राज्य हि या मोंगली सुभ्यांच्या गणतींत बसवलेलें आढळतें. सन १८०३ सालचा हिंदुस्थानचा अशा तऱ्हेचा जमाबंदी हिशेब काव्येतिहास संग्रह पत्रें यादी लेख ४७५ (नवा) मध्यें छापलेला आढळेल.

मोंगलांची ही सार्वभौमत्वाची कल्पना गाडून टाकण्यासाठीं शिवाजीनें छत्रपति-पदाची स्थापना केली होती. माझें स्वराज्य टीचभर असलें तरी तो कोणत्या हि मोंगली गुम्ब्याचा भाग नव्हे,हें स्वयंशासित स्वतंत्र राज्य–Sovereign State–आहे, त्याचें अस्तित्व बादशाही कृपेच्या रुनदेवर अवलंबून नाहीं, अशी व्यापक घोषणा शिवाजीनें राज्याभिषेकसमारंभ साजरा करून केली. छत्रपतींच्या या नूतन हिंदु राज्याचें नैतिक अधिष्ठान कोणतें ? तर यवनाक्रांत हिंदुस्थान पुनः हिंदूंचें करून सोडावयाचें. हिंदूंचा हिंदुस्थानांतील हक्क हा अर्थात च स्वयंभू, तो कोणा मोंगल बादशहानें मंजूर करण्याची आवश्यकता च काय ? ज्या दिवशीं हिंदु आपला जन्मसिद्ध हक्क बजावूं लागतील त्या दिवसापासून तो त्यांचा च. मध्यंतरी नादानपणानें तो हक्क बजाविला जाणें बंद राहिलें, म्हणून असला यावच्चंद्रदिवाकरौ हक्क मुदतीच्या कायद्यानुसार रद्द थोडा च होतो ? अशी शिवकालीन विचारसरणी होती. शिवाजीचा हा नवा वूट आपल्या साम्राज्याच्या मूलभूत कल्पनेवरच आघात करणारा आहे, हें औरंगजेबानें पुरेपूर ओळखलें.म्हणून च तो बाकी सर्व धंदे सोडून मराठ्यांचें राज्य बुडविण्यासाठीं सर्वस्व खर्ची घालून सतत पंचवीस वर्षे लटला.

साऱ्या हिंदुस्थानचें अधिराज्य मुसलमानांचें नाहीं तर तें हिंदूंचें, या कल्पनेवर मराठ्यांच्या राज्याची उभारणी होती. ही कल्पना एका अर्थी स्वयंभू, सहज सुचण्यासारखी, पण मध्यंतरीं पांचशें वर्षे गाडली गेल्यामुळें हिंदूंचा पाया च दासळला होता. म्हणून च त्यांस मुसलमानांना यशस्वी रीतीनें तोंड देतां आलें नाहीं. पण या प्रभावी कल्पनेमुळें च शिवाजीला, शून्यांतून ब्रह्मप्रमाणें, मुसलमानी राज्याच्या पोटांत स्वतंत्र राज्य स्थापतां आलें. या संजीवनी मंत्रामुळें च कचा प्रमाणें पुनः पुनः मारलें गेलेलें मराठ्यांचें राज्य राजाराम-काळीं जिवंत होत राहिलें. ही कल्पना रूढ कल्पनेहून वेगळी असल्यामुळें व तिचा फैलाव महाराष्ट्रांतून इतर प्रांतांत क्रमाक्रमानें व्हावयाचा असल्यानें, महाराष्ट्रांत ही कल्पना कडवेपणानें टिकविणें हें आद्य कर्तव्य होतें. नवीन ( येथें खरें पाहिलें तर पुनरुज्जीवित ) तत्त्वज्ञान खोल रुजावयास आरंभींच्या कार्यकर्त्यांत एकमेवाद्वितीय निष्ठा, कणखरपणा, हट्टीपणा, फार काय तीव्र कडवेपणा हि असावा लागतो. तो नसेल तर जुनें तत्त्वज्ञान, जुन्या कल्पना पुनः वर डोकें काढतात व नव्याची मुंडी मुरगळतात. आरंभींचे ख्रिस्ती, बौद्ध, मुसलमान, कॅथलिक, आर्यहिंदु, सर्व कमीजास्त प्रमाणांत असेच हट्टी व कडवे होते. म्हणून च त्यांचा प्रसार झाला. आज हि या च जुन्या मार्गांचा अवलंब नव्या शतपट मारक शस्त्रांनिशीं करून कम्यूनिस्ट जगांत फैलावत आहेत. या देशांत मुसलमानांपूर्वी जे जेते आले ते कडवे नसल्यानें व त्यांचें स्वतंत्र ध्येयवादी तत्त्वज्ञान नसल्यानें येथील प्रजेंत मिसळून गेले. मुसलमान वेगळे होते, म्हणून खड्याप्रमाणें दुसऱ्यांचे दंत भग्न करून स्वतः पचनीं न पडतां टिकून राहिले आहेत.

कम्यूनिस्ट त्या च जातीचे आहेत. मुसलमानांचें राज्य झाल्यामुळें हिंदुस्थानांत कलियुगाची कल्पना सर्वत्र बोकाळली होती. अयशस्वी पुरुष ज्याप्रमाणें अंतीं दैववादी होतात त्याप्रमाणें मार खालेल्या हिंदूंत कलीचें थेपडें फारच माजलें. हें असें व्हावयाचें च, हिंदूंना जय यावयाचाच नाहीं, धर्माचा उच्छेद व्हावयाचा हें भविष्यपुराण च सांगतें—अर्थात् या भविष्य पुराणांतील एतद्विषयक भाग मुसलमान स्थिरावल्यानंतर च लिहिला गेला—असली विचारसरणी सर्वत्र हाडींमाशीं खिळली होती. दक्षिणेपेक्षां उत्तरेंत ती जास्त बद्धमूल होती. महाराष्ट्रांतल्या बऱ्याच भागांतून ही कल्पना खणून टाकण्याचें काम रामदासांसारख्यांनीं केलें, म्हणून च शिवाजीचें कार्य शक्य झालें. वीर पुरुष हा कोणत्या हि कार्यांत बाणाचे टोंकासारखा असतो. त्या टोंकानें शत्रु प्रत्यक्ष मारला जातो हें सत्य असलें, तरी केवळ त्या अणकुचीदार टोंकाचा दोन तीन इंच लांबीचा पोलादी तुकडा कांहीं धनुष्यावरून मारतां येत नाहीं. त्याचे पाठीमागें लांब मजबूत काठी लागते. तरोंच धनुष्याची कांब व त्याची दोरी हि बळकट, न मोडणारी व तुटणारी, असावीं लागतात. या शेविज मारण्याचा जोर व कौशल्य, मारणाराचा अचूक वेध व धीटपणा, यांची हि जरूरी असते. एवंगुण-विशिष्ट शिवकालीन समाज होता म्हणून च शिवाजीचें श्रम यशस्वी झालें. शाहूच्या आगमनानें व नंतर बाळाजी विश्वनाथाच्या दिल्लीहून आणलेल्या " स्वराज्याच्या " सनदेनें एका हिंदु छत्रपतीची अविभाज्य कल्पना सहज च नष्ट झाली. त्यामुळें च पेशव्यांची स्थिति दोन यजमानांच्या एक च नोकरासारखी कुतरओढीची झाली. बादशाही सनदेला अदूरदर्शीपणें महत्त्व दिल्यामुळें सनदा देणारा नामधारी बादशहा हिंदुस्थानच्या राजकारणांत चिरंजीव झाला. त्याचा च दृश्य परिणाम म्हणजे बादशहाचा दक्षिणेंतील प्रतिनिधि जो निजाम तो शतवार्षिक युद्धांत अनेकदां पराभव पावून हि कायम राहिला व पेशवे अनेक जय मिळवून हि नामशेष झाले. सुप्रतिष्ठित राजनैतिक तत्त्वज्ञान व टिळें चालटकलीचें संधिसाधु राजकारण यांमधील झगड्याचा हा असा शोचनीय निकाल लागणें शास्त्रीयभाषेंत क्रमप्राप्त च होतें. त्याच्यासाठीं अनेक स्वाऱ्या करून व पानिपतासारख्या आपत्ति स्वतःवर ओढवून घेऊन पेशव्यांनीं स्वतःच्या पराक्रमानें चिरंजीव केलेल्या मोगलपातशाहीचा उपयोग शहाण्या निजामास च झाला असें नसून त्याचा सर्वांत मोठा उपयोग परकी इंग्रजांनीं करून घेतला. १७५७ पासून १८५७ पर्यंत इंग्रजांनीं आपलें राज्य या पातशाही बुरख्याखालीं च सुरक्षितपणें वाढवून घेतलें, आणि असल्या संरक्षणाची गरज सरतांच तें लीलेनें फेकून दिलें. मोगलांच्या एकछत्री साम्राज्याची जागा अखेर इंग्रजांच्या " शांततेनें " घेतली.

पुणें—ता. २५ मार्च १९४०

---

(५)

॥ श्रीरामसमर्थ ॥

# राघवाचा धर्म

(लेखक-रा. दुर्गाराम बाल हरिदास, रामदासी, मंगलूर)

## उपोद्घात

या भरतखंडांत एका बाजूनें स्वमतांध व निष्ठुर यवनांचा जाच। दुसरे बाजूनें फिरंगी। क्षत्रिय हतवीर्य झाले असून परकीयांच्या सेवेंत धन्यता मानणारे। ब्राह्मण पहावें तो षट्कर्मांपैकीं दोन च शिल्लक। कांहीं मोजके विद्वान होते पण ते अभिमानपरंपरेनें वेटलेले। त्यामुळें जिकडे तिकडे प्रामण्यें। कोणी समाजाची सुधारणा करण्यास प्रवृत्त होतोसा दिसला कीं टाकला वाळींत।

त्या वेळीं जे सत्पुरुष झाले त्यांनीं तरी समाजास योग्य दिशा दाखवावी। पण ते तर प्रवृत्तीकडे पाठ करून स्वानंदीं मग्न। समाजांत पुढारी पुष्कळ। पण ते स्वार्थपर असल्यामुळें समाजास त्यापासून लाभ नाहीं। त्यामुळें जिकडे तिकडे निराशा। अशा वेळीं जांबगांवीं श्रीसमर्थांचा अवतार झाला।

त्यांना बाळपणीं च विश्वाची चिंता वाटूं लागली व त्या च वेळीं त्यांनीं "कल्याण करीं देवराया। जनहित विवरीं" अशी श्री प्रभु रामरायाची प्रार्थना आरंभिली। लहानपणीं च त्यांचें शरीरसामर्थ्य इतकें वाटलें कीं चांगल्या गड्यास हि भारी असें धान्याचें पोतें सहज उचलून पळत सुटल्याचें वृत्त त्याचे चरित्रांत आहे। उपनयनानंतर मानसिक शक्ति वाढविण्यास सुरुवात केली। पण शारीरिक शक्तीची वाढ थांबविली नाहीं। उपनीत बटूस नक्षोपदेशाचे वेळीं आचार्यांनीं आचार सांगून नंतर झाडावर चढूं नये, विहीरींत उतरूं नये, नदीपार पोहून जाऊं नये, वगैरे सांगितलें असतां श्रीसमर्थांनीं "आपण सांगितलेले आचार विचार सगळे पाळीन, पण धांवणें, चढणें, उड्या मारणें, विहीरींत उतरणें, पोहणें, हें मला सोडतां येणार नाहीं" असें सांगून सत्य व व्यायाम यांवरील आवड व्यक्त केली।

पुढें वयाच्या बाराव्या वर्षी विवाहांतून निसटून आपण लहानशा कुटुंबांत न गुरफटतां विश्वकुटुंब चालविण्यास निघाले । श्रीरामाचे आज्ञेप्रमाणें आपण सावध होऊन जगास सावध करण्याचा उद्योग आरंभिला । बारा वर्षे गोदातीरीं तप । स्वाध्यायपुरःसर चारी देहांच्या शक्ति वाढवून पुढे यात्रानिमित्तानें भरतखंडाचें सूक्ष्म निरीक्षण करून पहातां धर्मग्लानी हें च त्यांना देशाच्या हीन स्थितीचें कारण वाटलें । यात्रांतीं साऱ्या यात्रेचें उदक श्रीपंचवटीस श्रीरामाचे हातीं सोडलें, तेव्हां च धर्मप्रभु श्रीरामचरणीं प्रार्थना केली । ती ही

राघवाचा धर्म जागो । कीर्ती अद्भूत माजो ।
ठाईं ठाईं देवाळ्यें । भक्त मंडळी साजो ॥ ध्रु० ॥

शक्ति आहे तों चि फावे । दोन्हीं लोक साधावे ।
यहलोक परलोक । शत्रू सर्व रोधावे ॥ १ ॥

संसारीचें दुःख मोठें । हें मी कोणाला सांगों ।
जन्म गेला तुजविणें । आणिका काय मी मागों ॥ २ ॥

मागता समर्थाचा । तेणें कोणा मागावें ।
रामेविण कोण दाता । कोणा मागें लागावें ॥ ३ ॥

रामदास म्हणे देवा । आतां पुरे संसार ।
असंख्य देणें तुझें । काय देतील नर ॥ ४ ॥

या प्रार्थनेंत श्रीसमर्थांनीं जागविण्याच्या धर्माचीं संक्षेपतः स्वरूप, अधिकारी, हेतु, लक्षणें, कार्य व परिणाम प्रतिपादिलीं आहेत.

## थोडक्यांत स्पष्टीकरण

(श्री) राघवाचा धर्म । रघु शब्द लघि धातूपासून झाला आहे । त्या धातूचे अर्थ गति, आक्रमण, ज्ञान वगैरे आहेत । तेव्हां रघु म्हणजे असतांतून नसतांत, जगांतून सूक्ष्मांत जाणारा, अर्थात् ज्ञानी । त्यापासून झालेला तो राघव । म्हणजे ज्ञानगम्य सकलजगचालक जो परमात्मा त्याचा जो धर्म, धारणपोषण करणारा संदेश, तो जागो । त्यानें जगांतील दुःख दूर होऊन कीर्ती अद्भूत माजो आणि ठायीं ठायीं देवाळयें व त्यांत भक्तमंडळी साजो ।

(रा) धर्माचा अधिकारी । शक्ति आहे तों चि फावे । येथें व्यष्टि व समष्टीची शारीरिक, मानसिक, आर्थिक व सर्वांत मोठी आत्मीय शक्ति, वेदांती

भाषेनें सांगावयाचें तर, आध्यात्मिक, आधिभौतिक, व आधिदैविक शक्ति समजावी। यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः ॥

( म ) दोन्ही लोक साधावे। इहलोक परलोक। आणि शत्रु सर्व रोधावे। त्रिविध शक्तीवांचून सर्व शत्रूंचें रोधन शक्य नाहीं।

( दा ) संसारींचें दुःख मोठें हें कोणाला सांगूं। अर्थात् तुला च सांगावें। म्हणून सांगेन। जन्म ( वाया ) गेला तुजविणें। "धर्म एव हतो हन्ति धर्मो रक्षति रक्षितः"। तेव्हां आणिक काय मी मागों।

( स ) मागता समर्थाचा। तेणे धर्मसेवकानें कोणा मागावें। धर्मजागृति झाली कीं सर्व कांहीं साधतें। दुसऱ्यापुढें तोंड वासण्याची जरुर नाहीं। धर्मप्रभु श्रीरामावांचून दुसरा दाता च नाहीं। दुसऱ्यापुढें तोंड वासून अपमान व खेद यांशिवाय दुसरा लाभ नाहीं। याप्रमाणें निश्चय झाल्यावर सर्वत्र धर्मजागृति होऊन कधीं महाराष्ट्रचें आनंदवनभुवन, डोंगराच्या माथ्यापासून तो खेड्यापर्यंत आनंदी आनंद झाल्यावर, श्रीसमर्थ म्हणतात, " असंख्य देणें तुझें। काय देतील नर॥"

हा च राघवाचा धर्म ग्रंथराज दासबोधांत सविस्तर वर्णिला आहे. 'जें वेदांचे अभ्यंतरीं। तें काढून आपल्यापरी। शिष्यश्रवणीं क्वचित् भरी। उद्धारवचनें॥'।

कर्म उपासना आणि ज्ञान। त्रिकांड वेद हें प्रमाण। वेदविरहित तें अप्रमाण। अप्रिये भगवंता॥ जें जनावेगळें केलें। तें वेदें अव्हेरिलें। वगैरे

अर्थात् राघवाचा धर्म म्हणजे श्रुतिप्रतिपादित धर्म च। श्रीसमर्थांनीं देशकाल-वर्तमानाचा विचार करून, जनाचे अधिकार जाणून, सुगम मराठी भाषेंत सांगितलेला

श्रीमत् ग्रंथराजांत अधिकारभेदानें सर्वत्र धर्मप्रतिपादन च आहे। त्याचें च संक्षिप्त रूप मनोबोध होय। मनोबोधाच्या प्रथम श्लोकाच्या अखेरीस श्रीसमर्थ म्हणतात, "गमूं पंथ आनंत या राघवाचा॥" दोन्ही ग्रंथ रोज वाचल्यास आपला अधिकार ओळखून आपल्यास अनुकूल धर्म निवडून तो आचरणास सुलभ होईल।

श्रीसमर्थकालीं समाजाची स्थिति झाली होती त्याहून आजची स्थिति विकट आहे। तरी अशा वेळीं श्रीसमर्थांची शिकवण प्रत्येक मनुष्यानें ध्यानीं घेऊन यथाधिकार आचरण केल्यास आपल्या उत्कर्षासाठीं दुसऱ्याचें तोंड पहाणें नको। तरी प्रत्येक मनुष्यानें श्री ग्रंथराज दासबोध व मनोबोध हे ग्रंथ नित्यनियमानें वाचावे आणि त्यांतील आज्ञा यथाशक्ति पाळाव्या अशी विनंति करून हा लेख संपवितों. ॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

१८६१ फाल्गुन वद्य १३

( ६ )

# कांहीं आठवणी

## व

# श्रीमत् दासबोधाकडे पहाण्याची माझी दृष्टि

( लेखक – रा. विष्णु सीताराम रणदिवे, धुळें )

सन १८९८ सालीं एके दिवशीं माझ्या एका स्नेह्यानें त्या वेळचे धुळ्याचे सार्वजनिक कार्यकर्ते व सत्कार्योत्तेजक सभेचे एकमेव सर्वाधिकारी चिटणीस श्री. शंकर श्रीकृष्ण ऊर्फ नानासाहेब देव यांचे घरीं रात्रौ ९|१० चे सुमारास मला नेलें. श्री. नानासाहेब देव बसत असत त्या खोलीच्या दरवाजावर माझ्या स्नेह्यानें बोटानें टिचटिच आवाज केला; सदरा घातलेली व गळ्याचीं बटनें न लावलेली नानासाहेबांची मूर्ति दरवाजा उघडून बाहेर आली. माझ्या स्नेह्यानें माझी ओळख करून दिल्यानंतर आमच्या तालमीसंबंधीं विचारपूस करून ' केव्हां हि येत जा ' म्हणून मला नानासाहेबांनीं सांगितलें. आमच्या वारंवार भेटी होऊं लागल्या, आणि योगायोग म्हणा किंवा ऋणानुबंध म्हणा, त्यांचा आणि माझा कायमचा संबंध जडला.

त्या वेळीं सत्कार्योत्तेजक सभा म्हटली म्हणजे धुळ्याच्या पांझरा नदीच्या वाळवंटांत बसून देशाबद्दल विचार करणारी कै. गोविंद काशीनाथ ऊर्फ नानासाहेब चांदोरकर, श्री. भास्कर वामन ऊर्फ तात्यासाहेब भट, श्री. गोपाळ रावजी ऊर्फ नानासाहेब गोगटे व श्री. नानासाहेब देव ही चार मंडळी होत. वाळवंटांत येत होत व ते पुढें अंमलांत येत. सन १९०३ च्या डिसेंबरांत रामदासी कार्य सुरू होण्यापूर्वीं श्री. नानासाहेबांचा ' आपण कोण ' हा निबंध व ' जपानची मर्दुमकी ' हें पुस्तक सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलें होतें. तसें च सभेचीं त्या वेळचीं कामें म्हटलीं म्हणजे शिवाजीउत्सव, वसंतव्याख्यानमाला, प्रिपरेटरीस्कूल व हातमागाचा कारखाना हीं होत.

या चाळवंटांत मी हि कधीं कधीं जात असे. आमच्या तालमीबद्दल जेव्हां विषय निघत असे, त्या वेळीं नानासाहेब म्हणत असत कीं, तालमी ह्या नुसत्या शरीरसंवर्धनाच्या शाळा नसाव्यात, त्या राष्ट्रीय जागृतीचीं स्थानें असाव्यात, त्यांत येणाऱ्या मुलांना उत्तम नागरिकत्वाचें व राष्ट्राच्या सेवेचें शिक्षण मिळावें. तेव्हांपासून राष्ट्रीयत्व हें आमच्या तालमीचें एक ध्येय ठरलें गेलें. या तालमीचें त्या वेळचें नांव 'पाताळे तालीम' असें होतें, परंतु पुढें चालकांना त्यांत व्यक्तिपूजेचें भूत शिरण्याचा संभव वाटूं लागल्यामुळें त्या तालमीला हल्लीचें 'विजय व्यायाम मंदिर' हें नांव देण्यांत आलें. या संस्थेच्या त्या वेळच्या चालकमंडळींत राष्ट्रीय वृत्ति जागृत करण्यास सत्कार्योत्तेजक सभेचा फार उपयोग झाला. सभा म्हणजे देव, भट, गोगटे व चांदोरकर; या व्यतिरिक्त पांचवा सभेचा सभासद मला माहीत नाहीं.

सत्कार्योत्तेजक सभेनें रामदासी संशोधन सन १९०३ च्या डिसेंबरमध्यें प्रथम सुरू केलें. त्या काळांत भर उन्हाळ्यांत खेड्यापाड्यांतून बैलगाडीचा प्रवास करणें फार त्रासाचें व श्रमाचें होतें. उन्हाळ्याच्या सुटींत खानदेशांतील सुखवस्तु लोक थंड हवेच्या ठिकाणीं रहावयास जात; परंतु ही सभेची मंडळी संशोधनासाठीं स्वतःचे पैसे खर्च करून ह्या मुलाचा मार्ग पत्करीत. एखाद्या मठांत भर दोन प्रहरीं पोहोंचल्यावर तेथें जेवावयास मिळेल च असा भरंवसा नसे, मठपति विचारपूस हि करीत नसत, कागदपत्रांबद्दल चौकशी केली तर मठ जळाला व कागदपत्र त्यांत दग्ध झाले असें च उत्तर प्रथम मिळावयाचें; दर्शन घेऊन परत जातांना देवापुढें रुपया ठेवला तर मग मात्र प्रसादाची आठवण मठपतींना व्हावयाची व कुचका नारळ व खारका प्रसाद म्हणून मिळावयाच्या. रुपया ठेवला तर नारळ व खारका, आठ चार आणे ठेवले तर नुसत्या च खारका व दिडकी ठेवली तर नुसता कपाळास बुका व वाळलेलीं चार फुलें असा प्रसाद देण्याचा दंडक बहुतेक मठपतींचा दिसला. अशी आपल्या मठांची व देवळांची स्थिति पाहून वाईट वाटे व त्यापेक्षां हे मठ सार्वजनिक झाले तर बरें नव्हे कां, असें हि मनांत येऊन जाई. आमचे नानासाहेब गोगटे तर विनोदानें म्हणत हि कीं, दोन प्रहरीं एखाद्या मठांत उतरणें झाल्यास अगोदर च गांवाबाहेर विहिरीवर फराळ करावा व एकैतेवी प्रत्येकाचा रुपया जावयाचा च, तर तो रुपया प्रत्येकानें मठांत शिरल्याबरोबर मठपतींच्या कानांवर रुपयाचा आवाज जाईल असा देवापुढें ठेवावा, म्हणजे मग प्रसादाची लाजेवाजिस्तव तरी सोय लागेल.

अशा या दगदगीचे प्रवासांत श्री. देवांचेबरोबर त्यांची ही त्रिवर्ग मित्र-मंडळी बहुधा असत; अनेक वेळां मी हि त्यांच्याबरोबर असें. या त्रिवर्गांपैकीं कै. नानासाहेब चांदोरकर या उदार अंतःकरणाच्या देशभक्तानें शिवपदांचें चळवळींत एके दिवशीं रात्रीं अंगांत ताप असतांना हि उघड्या मैदानांत व्याख्यान

दिलें व दुसरे दिवशीं त्यांचा ताप वाढून आठ च दिवसांत त्यांचा अंत झाला. सभेच्या अशा या सभासदांनीं गाजावाजा न करितां खेड्यापाड्यांत, टोंगरा खोऱ्यांत, उन्हातान्हांत फिरून रामदासी वाङ्मय मिळविलें व तें छापून काढलें.

रामदासी वाङ्मयाबरोबर रामदासी जीर्णोद्धाराचें हि फार मोठें कार्य सत्कार्योत्तेजक सभेनें केलें. सभेनें केलेलें जीर्णोद्धाराचें पहिलें कार्य म्हणजे शहापुर येथील श्रीसमर्थांच्या संध्यामठाचें होय. त्याचा खर्च एकट्या नानासाहेबांनीं च सोसला. सभेनें नंतर सार्वजनिक वर्गणीनें सज्जनगडावर फरसी केली, जांब येथें श्रीसमर्थांच्या जन्मस्थानीं भव्य मंदिर उभारलें, श्रीसांप्रदायिक वाङ्मयाच्या सुरक्षिततेसाठीं धुळ्यास श्रीसमर्थवाग्देवतामंदिर बांधून बहुमोल अशा हस्तलिखि-तांच्या प्रचंड संग्रहासह महाराष्ट्राच्या उपयोगासाठीं तें विश्वस्तांच्या स्वाधीन केलें, आणि या संग्रहाचा अभ्यास करण्यासाठीं येणाऱ्या पाहुण्यांची रहाण्याची सोय व्हावी म्हणून मंदिराशेजारीं च अभ्यागताश्रम बांधिला. हीं सारीं जीर्णोद्धाराचीं कामें मनांत येतें तर एकादा लक्ष्मीपुत्र एकटा लाख दोन लाख रुपये खर्च करून करूं शकता, व सभेच्या चिटणीसांना हि एखाद्या धनिकाकडून तसें करवून आणतां आलें असतें. परंतु तसें न करतां साऱ्या बृहन्महाराष्ट्रांत प्रवास करून त्यांनीं वर्गणी गोळा केली आणि हीं कामें केलीं. जांब हें गांव मोगलाईत असल्यामुळें मंदिर बांधण्यास खुद्द निजाम सरकारची परवानगी मिळवावी लागली. हें मंदिर बांधण्यास व त्याचा नित्यनैमित्तिक खर्च चालवून तेथील व्यवस्था ठेवण्यास श्री. नानासाहेब देवांना किती कष्ट व त्रास होत आहे याची कल्पना समर्थांचे म्हणविणाऱ्या महाराष्ट्रीयांना अद्यापि आलेली नाहीं व तिकडे त्यांचें लक्ष हि गेलेलें नाहीं! नुसते समर्थांना राष्ट्रगुरु मानून एक रुपया देऊन समर्थ-संघाचे सभासद होण्यांत काय अर्थ आहे न कळे! समर्थसंघाच्या प्रत्येक सभासदानें वर्षांतून एकदां — निदान आयुष्यांत तरी एकदां — जांबेच्या कार्यक्रमांत एक दिवस तरी भाग घ्यावयास नको कां? सभेच्या एका सभासदास सभेचीं वरील सर्व कामें करतां आलीं. पण समर्थसंघाच्या, समर्थांना राष्ट्रगुरु मानणाऱ्या, सभासदांच्या मनांत समर्थांच्या जन्मभूमीचें दर्शन घेण्याइतकी हि कर्तव्यनिष्ठा असूं नये याचें आश्चर्य वाटतें. शिवाजी महाराजांचे व श्रीसमर्थांचे म्हणविणाऱ्या महाराष्ट्रानें या उभयतां राष्ट्रपुरुषांनीं घालून दिलेल्या दंडकांपैकीं एक हि दंडक चालू ठेवला नाहीं म्हणून च या धर्माची व देशाची इतकी अवनति झाली! असो. सत्कार्योत्तेजक सभेच्या चिटणीसांनीं आतांपर्यंत जुन्या परंपरेप्रमाणें राष्ट्रीय कार्यें एकनिष्ठपणानें केलीं, या त्यांच्या उत्कट देशप्रेमाचें अनुकरण दुसऱ्या दास समर्थसंप्रदायिकांनीं करावयास नको काय!

सन १९१५ पर्यंतचा काळ जुन्या परंपरेच्या राष्ट्रीय वृत्तीच्या कार्यकर्त्यांचा होता, असें मी निदान माझ्यापुरतें तरी धरून चाललों आहे. त्या वर्षापासून श्रीमत् दासबोध ग्रंथांत काय सांगितलें आहे, त्या शिकवणींतून आपणांस काय घेतां येईल, या दृष्टीनें त्या ग्रंथाकडे मी पाहूं लागलों. असे विचार मनांत येण्यास ज्या कांहीं गोष्टी घडल्या त्यांपैकीं एका गोष्टीचा उल्लेख येथें करून नंतर दासबोध ग्रंथाबद्दल मला काय वाटतें तें आपण पाहूं.

सन १९१५ सालीं हरिद्वार येथें भरलेल्या कुंभमेळ्यांत स्वयंसेवकांचें काम करण्यासाठीं आमच्या तालमीचें एक स्वयंसेवकपथक गेलें होतें; त्यांत मी हि स्वयंसेवक म्हणून गेलों होतों. रहदारी सुव्यवस्थित ठेवणें (ट्रॅफिक कंट्रोल), कॉलरा फार होता तेव्हां रस्त्यांत कॉलऱ्याचे रोगी दिसतील ते हॉस्पिटलमध्यें पोहोंचविणें, त्यांचें औषधपाणी करणें, रस्त्यांत प्रेतें सांपडत तीं जाळणें, गंगेवर पाण्याचे बावतींत व इतर स्वच्छता ठेवणें, खाण्याचे पदार्थांवर देखरेख करणें, वहिर्विधीसाठीं नेमलेल्या ठिकाणांचा च उपयोग केला जाईल अशी दक्षता घेणें वगैरे कामें स्वयंसेवकांना तेथें करावीं लागत. आमच्या पथकानें मेळ्यांत चांगलें काम केलें. एके दिवशीं एका चिंचोळ्या आणि उताराच्या रस्त्यांत गर्दीचा लोंढा आला असतां तेथें उभे राहून लोकांना थोपवून धरण्याचें काम करण्यास पोलीस हि ज्या जागेवर राहूं शकले नाहींत, त्या ठिकाणची आपली जागा न सोडतां तेथें घटांनीं उभे राहून आपली कामगिरी आमच्या तालमीच्या पथकांपैकीं एक स्वयंसेवक रा. दत्तोपंत निरखे यांनीं इतक्या उत्तम रीतीनें बजाविली कीं, त्या वेळच्या पोलीस कमिशनरनें आमच्या स्वयंसेवकांच्या कॅम्पांत मुद्दाम येऊन त्या कामगिरीबद्दल रा. निरखे यांचें कौतुक केलें. तो माणसांचा लोंढा एवढा मोठा होता कीं, त्याखालीं दोन तीन मिनिटांत पंचवीस तीस माणसें चेंगरून मेलीं. त्यांत कडेवर लहान मूल घेतलेली एक बाई हि त्या सुमारास मेली.

निरनिराळ्या प्रांतांतून मेळ्यासाठीं सुमारें चार पांचशें स्वयंसेवक आले होते. कै. नामदार गोखल्यांच्या भारत-सेवक-समाजाचे एक प्रमुख सभासद कै. डॉ. हरि श्रीकृष्ण देव हे स्वयंसेवकांचे कॅप्टन होते. डॉ. देव हे आमच्या सत्यशोधक समेच्या चिटणीसांचे वडील बंधु होत. प्रागतिक पक्षाच्या या थोर व निर्मल अंतःकरणाच्या गृहस्थाची योग्यता फार मोठी होती. त्यांच्या सहवासानें माझ्या दृष्टींत फरक पडला. सन १९१७ सालीं चंपारण्यांत महात्माजींबरोबर लोकसेवेचें काम करतांना जीवाची आणि शरीराची डॉ. देव यांनीं कधीं पर्वा केली नाहीं, हें मी प्रत्यक्ष पाहिलें आहे. तेथील कष्टांचा परिणाम त्यांच्या शरीरावर होऊन त्यांना जलोदरासारखी दुर्धर व्याधि जडली, आणि त्यांत च १९१८ च्या ऑक्टोबरांत त्यांचा अंत झाला! या थोर माणसाचा सहवास मला जास्त लाभूं शकला नाहीं, हें मी माझें दुर्दैव समजतों.



रा. गणेश गोविंद टकले, धुळें

डॉ. देव यांच्या प्रेमळ अंतःकरणाची एकादी गोष्ट येथें सांगितल्याशिवाय पुढें जाववत नाहीं, म्हणून ती मी येथें देतों. कुंभमेळ्याचे मुख्य दिवशीं स्वयंसेवकांना सकाळी ७ ते सायंकाळीं ७ पर्यंत कामावर हजर रहावयाचा हुकूम स्वयंसेवकांचे कॅप्टन डॉ. देव यांनीं दिला आणि कामावर जातांना दोन प्रहरसाठीं पुरी व भाजी प्रत्येकास दिली. आमच्या कॅप्टननें आपली पुरी व भाजी मजजवळ च दिली आणि ' मी तुमचे बाजूस दुपारीं आलों म्हणजे घेईन ' असें सांगितलें. मी माझे जागीं गेलों; दोन प्रहरपर्यंत मी आमच्या कॅप्टनची वाट पाहिली; परंतु ते कामामुळें येऊं शकले नाहींत. मला भूक लागली होती, पण आपण स्वयंसेवक, आपल्या कॅप्टनला टाकून आपण कसें खावें असें सहाजिक च माझ्या मनांत आलें, व संध्याकाळच्या सात वाजेपर्यंत तसा च कामावर राहिलों. सात वाजतां कॅम्पकडे परत जातांना वाटेंत आमचे कॅप्टन डॉ. देव भेटले. मी त्यांना विचारलें, " तुम्ही कांहीं खालें कां ? " तेव्हां " माझी पुरी व भाजी तर तुझ्याजवळ च होती. कामाच्या गर्दीमुळें मला तुझ्याकडे येता आलें नाहीं; दुसरें घेऊन खाईन, तर मला वाटलें तूं मला टाकून खाणार नाहींस, " असें म्हणून मी कांहीं खालें कां म्हणून त्यांनीं चौकशी केली. मी हि कांहीं खालें नाहीं आणि त्यांच्या साठीं च उपाशी राहिलों होतों हें कळतां च ते थोडें हांसले आणि म्हणाले, " चल, आतां सर्वांबरोबर आपण कॅम्पांत च जेऊं. " अशा कॅप्टनला स्वयंसेवकांची उणीव केव्हां तरी पडेल कां ? या थोर गृहस्थांच्या अनेक गुणांबद्दल किती तरी गोष्टी सांगतां येतील. असो.

दासबोध हा ग्रंथ श्रीसमर्थांनीं केव्हां लिहिला ? एकदम लिहिला कां थोडथोडा लिहिला ? शिवथरच्या घळींत लिहिला कां हेळवाकच्या घळींत लिहिला ? याची सामान्य वाचकांना कांहीं जरूरी नाहीं. त्यांनीं दासबोध ग्रंथांत समर्थांनीं काय सांगितलें आहे, त्यांतील शिकवण आपल्या हल्लींच्या जीवनाला कितपत उपयोगी पडेल, त्या शिकवणींपैकीं कोणत्या गोष्टींचा अभ्यास करण्याची आपणांस आवड व शक्यता आहे, वगैरे गोष्टी सामान्य माणसानें लक्षांत घेऊन त्याप्रमाणें या ग्रंथाचा अभ्यास करून शक्य ती शिकवण कृतींत उतरविण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

समर्थ स्वतःस रामदास म्हणवीत असत, रामाचे दास, सेवक, ते रामदास. अर्थात् दासास, सेवकास, शिष्यास केलेला बोध तो दासबोध असा हि अर्थ क्षणभर केला तरी चालेल. तेव्हां या ग्रंथांत सहाजिक च शिष्यानें, सेवकानें, आचरण्यासारख्या, अभ्यास करण्यासारख्या किती तरी गोष्टी सांगितल्या आहेत. त्यांपैकीं कांहींचा येथें विचार करूं.

प्रथम हल्लींच्या काळीं या ग्रंथांतील सुशिक्षित समाजास न पटणाऱ्या कांहीं गोष्टींकडे आपण वळूं. दासबोध ज्या काळांत लिहिला त्या काळाकडे पाहिलें तर असें दिसून येतें कीं, तत्कालीन समाजावर जुन्या मताची पकड फार बसली होती, पुराण-मताभिमानी ब्राह्मण समाजाचें धार्मिक वर्चस्व ( कायस्थ प्रभूंचा लहानसा समाज सोडून ) बहुजन समाजावर फार होतें, तें इतकें कीं, शिवाजी महाराजांना क्षत्रिय ठरवून राज्याभिषेक करण्यास त्या वेळचा ब्राह्मण समाज तयार होईना ! अशा त्या काळांत समर्थांनीं ब्राह्मणाबद्दल दासबोधाच्या पांचव्या दशकाच्या पहिल्या समासांत व इतरत्र हि जे उल्लेख केले आहेत ते बरोबर वाटणें सहाजिक आहे, परंतु तेवढ्यावरून हल्लींच्या सुशिक्षित ब्राह्मणेतरवर्गानें या ग्रंथांत जी बहुमोल शिकवण सांगितली आहे तिकडे दुर्लक्ष करणें इष्ट होणार नाहीं. तिसऱ्या दशकाच्या आठव्या समासांतील आदिदैविक तापाचें वर्णन, चवथ्या दशकाच्या दहाव्या समासांत केलेलें पृथ्वीचें वर्णन वगैरे गोष्टी हल्लीं पुष्कळांना पटणार नाहींत. पण हें सर्व सोडून दिलें, तरी या ग्रंथांत सदा सर्वकाळ सर्वांना पटणाऱ्या पुष्कळ गोष्टी आहेत त्यांपैकीं कांहींचा जरी अभ्यास करून त्या आंगीं बाणवून घेण्याचा प्रयत्न केला तर मानवी जीवाचें कल्याण होणार आहे. सद्विद्यालक्षणें, विरक्तलक्षणें, सच्छिष्यलक्षणें वगैरे समासांत किती तरी घेण्यासारखें आहे.

> महावाक्य उपदेश भला । परी त्याचा जप नाहीं बोलिला ।
> तयीचा तो विचार चि केला । पाहिजे साधकें ॥ ५–६–११
>
> संसार त्याग न करितां । प्रपंच उपाधी न सांडितां ।
> जनामध्यें सार्थकता । विचारें चि होये ॥ ६–९–२४

आपणांपैकीं कोणी रामोपासक म्हणवितात, ते बहुधा रामाच्या मूर्तीची धूप, दीप, नैवेद्य वगैरे प्रकारें यथासांग पूजा करीत असतात आणि समाज हि त्यास रामभक्त म्हणून गौरवीत असतो. परंतु त्या माणसांत रामाच्या ठिकाणीं असलेल्या एका हि गुणाचा विकास झालेला नसतो. एक साधा गुण म्हटला म्हणजे राम एकपत्नीव्रती होते; पण हे बहुतेक भक्त बहुपत्नीव्रती असतात. आमचा परंपरागत दंडक च पडला आहे कीं, जो जितका जास्त कर्मठ तो तितका जास्त मोठा भक्त, उपासनेचा व गुणांचा कांहीं एक संबंध नाहीं. खरें म्हटलें तर सद्गुणांची उपासना ती च खरी उपासना होय. नुसती मूर्तीची गंध, धूप, दीप, दाखवून केलेली उपासना ही याचक बनविण्याची उपासना होय. मनुष्यानें चित्ताच्या वृत्तींचें शोधन करण्याचा अभ्यास केला पाहिजे. गुणविक्रमानें च मानवी जीवन चांगलें होईल.

समर्थांनीं संभाजी महाराजांना जें उपदेशपर पत्र पाठविलें आहे त्यांत शिवरायाचे गुण आठवावे, शिवरायाचा प्रताप आठवावा वगैरे त्यांनीं म्हटलें आहे. " मराठा तितुका मेळवावा । आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा । ये विषयीं करितां तकवा । पूर्वज हांसती ॥ " असा बोध समर्थांनीं त्या काळांतील कार्यकर्त्यांस केला आहे. येथें ' मराठा ' म्हणजे सर्व अठरापगड जाती, तसें च ' महाराष्ट्रधर्म ' म्हणजे स्वदेशाबद्दलचा आपला सामुदायिक धर्म असा च अर्थ नाहीं कां ?

महाराष्ट्रांतील सर्व लोकांची संघटना करून शिवाजी महाराजांच्या स्वराज्य-स्थापनेला श्रीसमर्थांना मदत करावयाची होती. म्हणून त्यांनीं त्या वेळच्या कार्यकर्त्यांना उपदेश केला कीं,

दुसऱ्याच्या दुःखें दुःखवावें । परसंतोषें सुखी व्हावें ।
प्राणीमात्रास मेळऊन घ्यावें । बऱ्या शब्दें ॥ १२–१०–७

जीव जीवांत घालावा । आत्मा आत्म्यांत मिसळावा ।
राहराहों शोध घ्यावा । परांतरांचा ॥ १५–१–४

तसें च त्यांनीं म्हटलें आहे कीं,

घालून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहून जाड ।
तेथें कैचें आणिलें द्वाड । करंटपण ॥ १२–९–२९

जो समाज आपल्या बुद्धीचा विकास न करतां परंपरागत चालत आलेल्या रूढीवर अवलंबून रहातो, त्याची बुद्धि जड बनून त्याची प्रगती खुंटते व तो समाज परंपरेचा गुलाम बनतो. तेव्हां रामदासींयांना विनंति कीं, त्यांनीं तरी पूर्वपरंपरेचे गुलाम न बनतां, हल्लींच्या जगाकडे विचारपूर्वक दृष्टि देऊन, समर्थांचा सदा सर्वकाळ उपयोगी पडेल अशा च उपदेशाचा अवलंब करून व त्या प्रमाणें वर्तन ठेवून हल्लींच्या राष्ट्रकार्याला यथाशक्ति मदत करावी.

पुणें – १८६२ चैत्र शुद्ध १



( ७ )

# — महान् क्रांतिकारक —

( लेखक—रा. पवन जोग, धुळें )

- शके १५१० त एका महापुरुषाचा जन्म जांबेसारख्या मोंगलाईतल्या गांवीं झाला. परमेश्वराचे महत् उपकार हिंदुस्थानावर नि हिंदुधर्मावर, सारा हिंदुसमाज खात्रीनें त्यांचा ऋणी राहील. खरोखर ही गोष्ट अलौकिक आणि पूर्वपुण्याईची च आहे. ब्राह्मण कुळांत एक पोर एका गरिबाच्या घरीं जन्मास येतें आणि जगद्विख्यात दिगंत कीर्ति मिळवून पोरक्या राष्ट्राचा उद्धार करितें. कल्पना चालत नाहीं, बुद्धि कुंठित होते, डोकें सुन्न होतें. पण ज्याच्या हृदयाला समाजाची भयानक स्थिति पाहून आग लागली असते त्याला कुठली हि गोष्ट अशक्यप्राय वाटत नाहीं. दुर्दम्य महत्त्वाकांक्षा, खंबीर वृत्ति, जाज्वल्य अभिमान आणि पेटलेली अंतःकरणाची मनोभूमिका यांच्या सामर्थ्यावर तो समर्थ होऊन राष्ट्राला तारण्यास सहज पात्र होतो.

त्याची वृत्ति ठरलेली असते, प्रत्यक्ष कृतांताला तो भीक घालीत नाहीं, हालाची नि मानाची त्याला दिक्कत नसते. मात्र समाजाला जागृत करण्याचें दिव्य कार्य त्याला सतीचें वाण समजून करावयाचें असतें. तें महत्तम कर्तव्य तो जाणून असतो. अशा साधुपुरुषाचा धर्म म्हणजे मरत मढ्यांना तेजस्वी आणि ओजस्वी वाणीचें अमृत पाजून जागें करणें, कार्यक्रम म्हणजे राष्ट्राचें पुनरुत्थान आणि मोक्ष म्हणजे दास्याच्या गर्तेतून पूर्णपणें मोकळे होऊन वीरसंदेश देणें होय.

महाराष्ट्र कृतज्ञ राहील विद्यानुभिस्या ! एका क्षणांतीत अनुकूल वातावरण घडवून आणणें सोपें नव्हे. देशाच्या उग्रतावस्थेची धग लागून करपलेल्या मनाच्या सांत्वनाकरितां परमेश्वरी आशीर्वाद घेऊन धीरोदात्त, बेडर पण पूर्णतया सर्वांगीण संदेश देणें क्षुद्रक नव्हे. साऱ्या सुखाच्या भावनांवर, आप्तबंधनांवर आणि ऐहिक लालसांवर पाणी सोडणें, चीवाचें रान, रक्ताचें पाणी, एवं च सर्वस्वाची राखरांगोळी करणें ही साधी गोष्ट नव्हे.

स्वतः पिचून जावचें, कशाकरितां, तर राष्ट्राचें मंगल व्हावें म्हणून; हाल-अपेष्टांशीं छातीचा कोट करून टक्कर द्यायची, कां, तर समाजाचें मोठ कल्याण

व्हावें म्हणून; आपण अन्नान्न करीत वणवण करावयाची व ती कशाकरितां, तर लोकांगेला जन्मजन्मांतरीची सुखाची परिसीमा प्राप्त व्हावी म्हणून.

हे क्रांतिकारक सद्गुरो, तुला अनंत प्रणाम असोत. तुझें मूल्य अबाधित आहे, तुझी कामगिरी अतर्क्य, तुझ्या कर्तबगारीचा आम्ही केवळ पाढाच वाचावा; राष्ट्रतारक तूं आहेस; राष्ट्रब्रह्म शिवराजांच्या वेळींसच आपला त्यांना बहुमोल उपदेश मिळाला आणि हिंदुपदपादशाहीचे सोहळे निर्माण झाले. शिवराय आणि आपण दोघे हि स्वयंभू आणि स्वतंत्र अवतारी पुरुष आहांत, दोघांची हि ती भव्य कामगिरी मानवजातीचें शिर सदा नत होण्यास च कारणीभूत होय.

समर्थ रामदास आणि राजे शिवाजी ही युति अद्वितीय होय. पण आज शिवरायांचा आदरपूर्वक उल्लेख करून समर्थांच्या संबंधीं विवेचन करावयाचें आहे. ते दिवस म्हणजे ऐन कचाव्यांतील द्वंद्वें चालली असतांनाचें होत. छोटीं छोटीं यवनी राज्यें आणि मुकतें च उदयास येणारें हिंदुराज्य, पण एकाचा उदय होतां च सृष्टिक्रमाप्रमाणें दुसऱ्याचा अस्त झाला.

रामदासस्वामींनीं जी संजीवनी दिली ती त्रिकालाबाधीत होय म्हणून तिचा थोडक्यांत आज विचार करावयाचा आहे. परवशतेच्या गर्तेत जखडून, सत्व आणि स्वत्व संपूर्णपणें विसरून गेलेल्या, क्वचित् काळझोपी गेलेल्या हिंदुसमाजाला त्यांनीं चेतना देऊन कार्यैकनिष्टेचें स्वरूप दिलें, कार्याशीं बद्धपरिकर बनविलें व ती कोणची किमया तर संघटित तयारी होय. त्यांनीं आपल्या संघटकांना केलेला उपदेश अति मार्मिक व सदोलत्वदर्शक आहे. त्यांच्या आत्मचरित्रांत तो सम्यक् आहे, पण मी मात्र इथें तो सूत्ररूपानें मांडणार आहे. पूर्वग्रहदूषित दृष्टि न ठेवतां खरोखर महाराष्ट्रांतील नव्हे, तर हिंदुस्थानांतील हरएक संघटकानें त्याचीं पारायणें करावींत. विष भिनतें ना, तसा तो रक्ताच्या थेंबागणिक भिनून गेला पाहिजे.

तीं क्रांतिकारक यथार्थ तत्त्वें कोणचीं तर प्रथम च प्रत्येक संघटकानें परिभ्रमण करून त्या भ्रमणांत जी देशस्थिति दिसेल, जें लोकसमाजाचें ज्ञान होईल त्याची चाळणा म्हणजे विवेक करावयाचा; अखंड त्याचा तो उद्योग पाहिजे. सूक्ष्मावलोकन आणि मनन त्यानें सदा सर्वदा विशिष्ट ध्येयतारेकेकडे दृष्टि विचलित होऊं न देतां केलें पाहिजे; हें पहिलें तत्त्व —

अशा रीतीनें कार्य करीत असतां हरएक बाबींत पडणाऱ्या कष्टाकरितां मनापासून तयारी व ते सहन होण्याकरितां गोटीबंद व ठेरार शरीरप्रकृति हि आली. त्याचें शरीर कष्टांना न भिणारें असेल तर कष्ट दूर पळतील आणि कार्य सुकर होईल. त्याचप्रमाणें तो शिष्य प्रयत्नवादी असला पाहिजे. प्रतिकूल परिस्थितीशीं झुंज घेणारे झुंजार मर्दवीर क्षणांत निर्माण होत नसतात; निरपेक्ष स्वार्थरहित हेतूनें दिवसानुदिवस तपश्चर्या करून इष्ट फलसिद्धि होत असते. पहिल्या च पदायाला

पण परतंत्रपणाच्या वेदना आतां जाणवूं लागलेला माझा हिंदुसमाज आणि हिंदु राष्ट्र केव्हां इच्छित स्थळीं पोहोंचणार ? त्यासाठीं श्रीसमर्थ, हा देश समर्थ कधीं होणार ?

तर मग हा देश असा च राहणार तर, पारतंत्र्याचें कां शिक्कामोर्तब झालें, आशा संपली आणि या दारुण यमयातनांत च कां साऱ्यांना वनवास, कधीं स्वतंत्रता क्षितिजावर दिसेल, कां तें भाग्य नाहीं—तशी आमची लायकी नाहीं—

पण असें कसें होईल ? आज दोन शतकांवर दिवस झाले असले, तरी आपल्या तत्वज्ञानाच्या अमृतवर्षावामुळें आमची पवित्र इच्छा सफल होईल, तें मंगल दृश्य आम्हांला दिसेल, सर्वत्र दिवाळीचा महोत्सव नांदेल, सर्वत्र सुख-समृद्धि होईल, मात्र आम्ही अजाण आपले एकनिष्ठ पाईक व्हावयास पाहिजे –

हे महान् क्रांतिकारका, महाराष्ट्राला क्रांतिदीक्षा देऊन अदृश्यमान झालेल्या तुझ्या अमर आत्म्याला अनंत नमनें असोत –

तूं गेलास, पण तुझे क्रांतिकारक विचार अमर आणि अजर आहेत-योग्य ती क्रांति ते जरूर घडवून आणतील –

महाराष्ट्राचा समर्थरूपी महान् क्रांतिकारक अस्ताचलास गेला, मग नूतन क्रांतिवीर उदयाचलास केव्हां येणार ?

धुळें – १८६२ श्रीहनुमानजयंती



( ८ )

# श्रीसमर्थ व सद्यस्थिति

( लेखक-रा. अनंत विश्वनाथ टिळक, धुळें )

श्री. नानासाहेब देव यांनीं श्रीसमर्थवाङ्मयाचा उद्धार केला व त्या वाङ्मयाचा व श्रीसमर्थांच्या शिकवणूकीचा महाराष्ट्रास किंबहुना सर्व हिंदु समाजास दृढ परिचय व्हावा यासाठीं त्यांचा प्रयत्न आहे. या हेतूनें श्रीसमर्थसंघ ही संस्था निर्माण करण्यांत येऊन या संस्थेच्या शाखा जिल्ह्याजिल्ह्यांत स्थापन करण्यांत येत आहेत. श्री. देव यांचा हा प्रयत्न अत्यंत आदरणीय आहे. श्रीसमर्थ हे राष्ट्रगुरु आहेत व त्यांचा उपदेश दासांस उद्धारक आहे, असें श्रद्धापूर्वक मानण्यांत येते व समर्थवाङ्मयाचा विवेचक दृष्टीनें अभ्यास केला म्हणजे हें मत बरोबर आहे याविषयीं शंका रहात नाहीं. याप्रमाणें श्रीसमर्थांच्या शिकवणूकीचा परिचय व्हावा व ती शिकवणूक अंगीं बाणावी या हेतूनें श्रीसमर्थचरित्राचा अभ्यास करणें व त्यांच्या वाङ्मयाचा परिचय करुन घेणें हें अत्यंत इष्ट आहे असें ठरल्यानंतर हि हें इष्ट कार्य विवेचक दृष्टीनें व जाणून करणें अत्यंत जरुर आहे. या चळवळीपासून जें हित साधण्यासारखें आहे त्याची स्पष्ट कल्पना करुन न घेतल्यास त्यापासून अपेक्षित हित न साधतां नुकसान होण्याचा हि संभव आहे. कारण कोणतें हि कार्य शास्त्रशुद्ध असल्यानें भागत नाहीं. तें शास्त्रीय पद्धतीनें करावें लागतें. याचें उदाहरण आपणांस गीतेंत पहावयास मिळतें. यज्ञ, दान व तप हीं मनुष्याला पावन करणारीं कर्मे आहेत. परंतु त्यांत हि सात्विक, राजस व तामस असे भेद गीतेनें केले आहेत. म्हणून श्रीसमर्थवाङ्मयाचा व चरित्राचा अभ्यास करणें हितप्रद आहे असें गृहीत धरलें तरी, या प्रयत्नापासून आपण कोणत्या हिताची अपेक्षा करावयाची यासंबंधीं आपण आपले विचार नीट रीतीनें तपासून घेणें जरुर आहे.

प्रत्येक व्यक्तीचें श्रेष्ठ कर्तव्य वर्तमान काळास अनुलक्षून असतें. युगधर्म नेहमी बदलत असतात याचा अर्थ असा कीं, निरनिराळ्या काळांतील परिस्थिति परस्पर असून त्या त्या काळांतील प्रगतीस पोषक असे विचारहि बदलत असतात.

अमुक गोष्ट साध्य होईल च असें नाहीं आणि लोकसमाज जर थंड न, तर त्यांत ऊब निर्माण करण्यास किती तरी प्रचंड अग्नि पाहिजे. म्हणून मन कष्टास व प्रयत्न परंपरेस सदा तयार ठेवणें हें दुसरें मौलिक तत्त्व.

तसेंच देहाच्या क्षणभंगुरत्वाची जाणीव ठेऊन विद्युल्लतेच्या गतीनें कामाचा डोंगर उरकणें, परंपरा निर्माण करणें, कार्यविलंब न करणें व हें करीत असतांना विरागी असणें हा संदेशांतील तिसरा मौलिक भाग. वैराग्य तर लोकसंग्रह करणाऱ्यास अतिशय आवश्यक असतें. त्याविना स्वतःचें मन कार्याच्या मध्यबिंदूवर केंद्रीभूत होऊं शकत नाहीं आणि देह म्हणजे पाण्यावरचा बुडबुडा, पायाखालची सावली ही जाचणी आणि टोचणी असली म्हणजे दुप्पट अवसान येऊन अभि-वांच्छित जास्त जास्त समीप च येतें.

साहजिक च या गुणांबरोबर संघटकानें, लोकजागृति करणाऱ्यानें, निस्पृह असणें तर फार महत्त्वाचें असतें. निस्पृहत्व अंगीं बाणल्याशिवाय साधी नेहमींच्या व्यवहारांतली गोष्ट देखील साध्य होत नाहीं. मग प्रचंड कार्याचा उरक करितांना तर ती आवश्यक बाब च होऊन बसते. सर्व बाबतींत निस्पृह व्हा म्हणजे च गुलामी वृत्तीचें उच्चाटन आणि निर्दळण करा, पण त्याच बरोबर मृदुवचनी हि असा. लोकसमुदाय करण्यास निघालेल्यानें समाजाच्या प्रवृत्तींचा वा नैसर्गिक गुणधर्मांचा अभ्यास करून सदा मृदु बोलावें, गोड बोलण्यानें कार्याची सपाटून प्रगति न झाली, तरी हानि मात्र कदापि होत नाहीं. मुंगी होऊन सदा वर्तावें, अंतःकरणें काबीज करण्याला, तीं मंत्रमुग्ध करण्याला हा च एकमेव मार्ग होय. श्रीसमर्थांच्या तत्त्वज्ञानाचा हा चौथा पैलू होय.

क्षमा, शांति आणि सहिष्णुता हा पांचवा दैदिप्यमान हिरा होय. अरे, तुम्ही वीर पुरुष आहांत, क्षमा तर तुमच्या कंठीं असावयास पाहिजे. मातेची महान कामगिरी म्हणजे पुत्राला गोंजारणें पण त्याचबरोबर रास्तपथाचें दिग्दर्शन हि करणें होय. माणसें चुकतील पण म्हणून तुम्ही चुकण्याचा महामूर्खपणा करूं नका. सात्विक वृत्तीचे व्हा, संयमी बना, शांत वृत्तीनें म्हणजे च अंतर्बाह्य शुद्ध व सोज्वल राहून आक्रमण करा; यश तुमच्यापुढें हात जोडून येईल, मात्र असहिष्णु हि कुणाशीं राहूं नका, आपलें तें ब्रीद नव्हे, तें आपलें कर्तव्यकर्म नव्हे, आपल्या कार्यक्रमाशीं तें विसंगत होय.

पण तरी हि परोपकारी असा, समाजाला समजत नाहीं तोंपर्यंत त्यांना पुढें रहा आहे, बाबांनो, कशाला त्या मार्गानें जाण्याचा हटवादीपणा करतां हें सांगण्यास तुम्ही सरसावलांत, यांत च तुमच्या परोपकारीपणाचें बीज आहे. पण या परोपकाराची दुसरी हि बाजू आहे व ती म्हणजे जनसेवा करीत असतां त्यांच्यावर प्रसंगविशेषीं उपकार म्हणजे मदत करणें आणि

तीं देसील कार्यक्रमांतील प्रथम दर्जाची बाब म्हणून. किती मानसंशास्त्राला धरून रामदासस्वामींनीं संदेशामृत पाजिलें आहे. कुठें हें अगाध ज्ञान त्यांना मिळालें, केवळ त्यांचे श्रीराम च जाणोत. रामदासी म्हणविणाऱ्याच्या ठायीं आवश्यक च नव्हे तर त्याचा स्वभावविशेष असणारा हा सहावा गुण.

उत्कटता हा तर मेरुमणी, तत्वमंदिराचा झिलईदार सोनेरी कळस च होय. वर वर्णिलेले सहा सद्गुण तर पाहिजेत आणि व्यासंगपूर्वक असावे, पण खेरीज इतर गुणांची पराकाष्ठा त्यानें अंगीं कमाविली पाहिजे, तर च कार्यपरंपरेला आणि एकंदर यशाला योग्य तो उजला मिळेल, अन्यथा नाहीं.

समर्थांच्या बहुमोल तत्वज्ञानाची केवळ एक बाजू मी मांडली मात्र, सर्वांगीण विवेचन विस्तारभयास्तव टाळलें. श्रीमत् दासबोधांत हा विषय मांडतांना समर्थांनीं जी काव्यवाणी आपल्या महाभाग्यानें ठेविली आहे ती मुखपाठ करणें हें सध्यांच्या समाजसंघटकाचें आठवें कर्तव्य असावयास कांहीं हरकत नाहीं. समर्थांची सारी च काव्यवाणी तिखट आणि अग्नीप्रमाणें दाहक व तितकी च पवित्र हि आहे. तिचा अनुभव मुळांतून च घ्यावा. समर्थांच्या या बहुमोल संदेशाची दुसरी बाजू हि प्रत्येकानें ज्ञात करून घ्यावी.

ही क्रांतितत्वाची घोषणा करून साऱ्यांना खडबडून जागे केले समर्थांनीं, अन्य हि महाभागांचा त्यांत वांटा आहे; पण समर्थांचा मान वडील वरचा आहे. " मुमुक्षु बना " हा संदेश, पण तो केवळ टाळ कुटीत मोक्ष मिळविण्याचा नव्हे. केवळ वारकरी नकोत तर धारकरी बना. स्वातंत्र्यशाहीर कवि गोविंद म्हणतात " मोक्ष म्हणजे मोकळे होणें, स्वायत्त होणें, स्वतंत्र होणें— " तंतोतंत रामदासांची ही च प्रखर आणि उज्ज्वल संदेशाची सप्तपदी आहे. " ती च खरी राष्ट्रीय सप्तपदी होय ". एक एक तत्त्व – पैलू म्हणजे स्वयंप्रकाशित सूर्याचें तेजस्वी किरण आहे. ती सप्तर्षींची दिव्य प्रभावळ आहे, तींत यश आहे, तेज आहे, जोम आहे, समाजाच्या नाडीचें खरें तीक्ष्ण ज्ञान प्रत्येक शब्दाशब्दांत रसरसतें आहे, जसा आम्रा रस रसरसतो –

एकूणएक हिंदु संघटक समर्थवाङ्मयाचा ज्वलत् जहाल अभिमानी बनावा व त्यानें प्रत्यक्ष आचरणांत आणण्यानें च केवळ समाज रक्षित व उच्चपदाधिष्ठित होणारा हा संदेश रोमरोमांत भिनवून घ्यावा–तो संदेश म्हणजे जिवंत करूं शकणारी संजीवनी विद्या आहे.

महाकवे, शके १६०३ त आपली अवतार समाप्ति झाली, पण या अभागी देशाच्या जीर्णजर्जर पारतंत्र्य अवस्थेची समाप्ति कधीं होणार ? आपल्या आशीर्वादानें आणि पुढारिपणामुळें हिंदुपदपादशाही शिवराज्य स्थापूं शकले, पण हा परदलित हिंदुस्थान रामराज्य केव्हां उपभोगणार ? राष्ट्रगुरो, आपण निघून गेलांत,

ज्या व्यक्तीस आपल्या काळांतील प्रगतीस पोषक असें कार्य करावयाचें असेल त्यानें त्या काळांतील प्रगतीस उपकारक अशा विचाराचा व कार्याचा अवलंब केला पाहिजे. तीनशें वर्षांपूर्वीच्या परिस्थितींत जे विशिष्ट विचार व विशिष्ट कार्य राष्ट्राच्या प्रगतीस पोषक असेल तेच विचार व तें कार्य हल्लींच्या स्थितींत पोषक असेल असें नाहीं. म्हणून कोणत्या हि व्यक्तीनें वर्तमान काळास अनुरूप असा च विवेक ग्रहण करण्यास तयार असलें पाहिजे. समाजाच्या प्रगतीस अशा प्रकारची वृत्ति अत्यंत जरूर असल्यामुळें ज्यामुळें व्यक्तीची बुद्धि व प्रवृत्ति वर्तमान काळाशीं पराङ्मुख होऊन कोणत्या तरी गत काळाशीं ज्यायोगें समरस होईल असें कार्य समाजाच्या हल्लींच्या प्रगतीस पोषक न होतां उलट हानिकारक होण्याचा संभव आहे. म्हणून समर्थवाङ्मयाचा अभ्यास करीत असतां अभ्यासक आपलें हल्लींच्या काळांतील कर्तव्य करण्यास अधिक पात्र कसा होईल ही दृष्टि ठेऊन च श्रीसमर्थवाङ्मयाचा अभ्यास करणें जरूर आहे. या अभ्यासानें अभ्यासक जर हल्लींच्या काळापासून व या काळास अनुरूप अशा प्रयत्नापासून पराङ्मुख होईल तर श्रीसमर्थवाङ्मयाचा अभ्यास ही एक आपत्ति आहे असें मानावें लागेल. म्हणून अभ्यासकानें अभ्यास करतांना समर्थ वाङ्मयांतून हल्लींच्या काळांत जो उपदेश अनुरूप असेल तो च ग्रहण करण्याची बुद्धि ठेवून अभ्यास करणें जरूर आहे. व अशा प्रकारचा हल्लींच्या काळाला अनुरूप असा उपदेश समर्थवाङ्मयांतून भरपूर मिळण्यासारखा आहे.

व्यक्तीचें श्रेष्ठ कर्तव्य वर्तमान काळास अनुलक्षून आहे. ही भूमिका मान्य करून समर्थवाङ्मयाच्या व चरित्राच्या अभ्यासापासून आपणांस कशाची अपेक्षा करावयाची हें लक्षांत घेतल्यानंतर हा प्रयत्न कोणत्या वृत्तीनें करणें जरूर आहे. याचा हि विचार केला पाहिजे. गत पुरुषांचें स्मरण करण्यांत अनेक वेळां जी वृत्ति दिसते ती राष्ट्राच्या हितास पोषक नाहीं असें म्हणावें लागतें व या वृत्तीस निष्क्रियतेची वृत्ति असें नांव देणें भाग पडतें. मनुष्य हल्लींच्या काळासंबंधीं निष्क्रिय राहून गतकाळाचें स्मरण करून आपल्या मनाचें समाधान करीत असतो असें अनेक वेळां दिसतें. पूर्वींच्या उज्ज्वल काळाचें स्मरण करावें, त्या काळाचें कौतुक करावें, होऊन गेलेल्या थोर पुरुषांचें स्मरण करून त्या थोर पुरुषांच्या पराक्रमाचें व गुणांचें रसभरित वर्णन करावें व त्या अपेक्षेनें आपण हल्लीं किती पतित झालों आहोंत, हल्लीं आपण किती क्षुद्र आहोंत, असें अनुमान दर्शवून हल्लींच्या काळासंबंधींचें आपलें कर्तव्य केलें अशी आपली व लोकांची दिशाभूल करावी अशी अनेकांची वृत्ति दिसून येते. परंतु ही वृत्ति अत्यंत घातक आहे. पूर्वींच्या इतिहासाचें स्मरण करण्याचा मुख्य हेतु हा असला पाहिजे कीं, तें स्मरण हल्लींच्या काळाच्या प्रगतीस पोषक असें झालें पाहिजे.

हा हेतु नसेल तर, गत काळाचें स्मरण करणें निरर्थक होतें. आम्हीं वर जी वृत्ति सांगितली त्या वृत्तींत वर्तमान काळाच्या प्रगतीचा हेतु नसल्यामुळें ती वृत्ति अत्यंत टाकाऊ आहे व ही वृत्ति ठेवून होणारा समर्थवाङ्मयाचा अभ्यास अभ्यासकास व राष्ट्रास निरुपयोगी आहे. पूर्वीं थोर पुरुष होऊन गेले व हल्लीं मात्र अंधार पडला आहे असें मानणें म्हणजे ईश्वरी कार्य स्थगित झालें असें मानण्यासारखें आहे. प्रत्येक काळांत थोर पुरुष निर्माण होतात व त्या काळास अनुरूप असा विवेक निर्माण करीत असतात. श्रीसमर्थवाङ्मयाच्या अभ्यासानें अभ्यासक नवीन विवेक ग्रहण करण्यास अधिक समर्थ न होईल तर त्याचा हा अभ्यास निरर्थक झाला असें म्हणणें भाग आहे.

श्रीसमर्थवाङ्मयाचा अभ्यास करतांना दुसरा एक धोका उत्पन्न होण्याचा संभव आहे. त्यापासून सावध रहाणें जरूर आहे. जो मनुष्य नेहमीं पूर्वीच्या इतिहासाचें मनन करीत असतो तो स्वाभाविकपणें च त्या काळाशीं समरस होऊन जातो व त्या काळास अनुरूप असलेला अभिनिवेश त्याच्या आंगीं बाणतो व असें झाल्यास वर्तमान काळासंबंधाची त्याची दृष्टि दूषित झाल्याशिवाय रहात नाहीं. म्हणून पूर्वीच्या इतिहासाचा अभ्यास करीत असतां त्या इतिहासापासून कोणत्या गोष्टी ग्रहण करावयाच्या व कोणत्या गोष्टी नैमित्तिक म्हणून सोडून द्यावयाच्या, याचा पूर्णपणें विवेक करणें जरूर आहे. पूर्वीच्या परिस्थितीमुळें त्या वेळीं त्या वेळच्या कार्यकर्त्यांच्या ठिकाणीं जे विकार निर्माण झाले असतील ते विकार आपल्या मनांत उत्पन्न होणार नाहींत अशी अभ्यासकानें खबरदारी घेणें जरूर आहे व या बाबतींत पूर्वीच्या इतिहासाकडे शांत व निर्विकार दृष्टीनें पाहतां येईल अशी दृष्टि अभ्यासकाच्या आंगीं बाणली पाहिजे. त्या काळांत उत्पन्न झालेले विकार नैमित्तिक असतात, त्यांचा त्याग करून समाजाच्या प्रगतीस पोषक अशी सनातन तत्त्वें असतील त्यांचा च अभ्यास आपणांस करणें जरूर आहे. व हा च इतिहासाच्या अभ्यासाचा खरा हेतु. असें न करतां इतिहासाच्या अभ्यासापासून जुनीं भांडणें जर ताजींतवानीं व्हावयाचीं असतील तर पूर्वीच्या इतिहासाचा अभ्यास ही एक आपत्ति आहे असें म्हणावें लागेल. श्रीसमर्थवाङ्मयाच्या अभ्यासकानें हा धोका टाळणें जरूर आहे.

श्रीसमर्थवाङ्मयाचा अभ्यास करतांना तिसरी एक गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे. श्रीसमर्थ हे अध्यात्मदृष्ट्या थोर सत्पुरुष होते, त्या च प्रमाणें व्यवहारदृष्ट्या नवविचारप्रवर्तक क्रांतिकारक पुढारी होते. समर्थवाङ्मयाचा अभ्यास करतांना ते सत्पुरुष होते, ही दृष्टि बाजूस ठेवून चाललें पाहिजे. ही दृष्टि बाजूस ठेविल्याशिवाय व श्रीसमर्थ हे एक थोर राष्ट्रपुरुष होते एवढी च दृष्टि आपल्या समोर ठेविल्याशिवाय समर्थवाङ्मयाचा विवेचक दृष्टीनें अभ्यास होणें कठीण दिसतें व विवेचक दृष्टीनें अभ्यास केल्याशिवाय या अभ्यासापासून तादृश फायदा होईल

असें आम्हांस वाटत नाहीं. किंबहुना जो उपदेश हल्लींच्या हि काळांत राष्ट्रास उद्धारक आहे असें आपण मानतों त्या उपदेशाचें वास्तविक स्वरूप हि आपल्या लक्षांत येणार नाहीं. याचें कारण स्पष्ट आहे. सत्पुरुषांचे ग्रंथ मनुष्य श्रद्धेनें वाचतो. श्रद्धेच्या स्थितींत विवेचक शक्ति मलूल होऊन जाते व अशा सुप्त बुद्धीच्या स्थितींत अभ्यासकास त्या वाङ्मयापासून कोणता फायदा होणार? आतांपर्यंत समर्थवाङ्मयाचा अभ्यास बहुशः पारमार्थिक दृष्टि प्रमुख ठेवून झाला आहे. तो अभ्यास केवळ व्यावहारिक ऐतिहासिक दृष्टीनें होणें जरूर आहे. हा आमचा कटाक्ष आहे. श्रीसमर्थकालींतील इतिहासाचा संदर्भ लक्षांत ठेवून समर्थग्रंथांचा अभ्यास होणें जरूर आहे. दासनवमीच्या उत्सवांत दासबोधाची अखंड पारायणें केल्याचें वर्णन आपण वाचतों त्यावरून असा इषारा देणें किती जरूर आहे, याचा अभ्यासकानें विचार करावा. आमची स्पष्ट तक्रार अशी आहे कीं, ही पारमार्थिक दृष्टि आड येत असल्यामुळें श्रीसमर्थांचा उपदेश अद्याप आपणांस यथार्थ दृष्टीनें हस्तगत झाला नाहीं.

श्रीसमर्थवाङ्मयाचा अभ्यास कोणत्या वृत्तीनें करावा याचें विवेचन झाल्यानंतर श्रीसमर्थांच्या उपदेशांतील वैशिष्ट्यदर्शक गोष्टी कोणत्या त्यांचा थोडक्यांत उल्लेख करतों. पहिला विशेष हा कीं, समर्थ हे अत्यंत प्रखर बुद्धिवादी होते. ज्याचा प्रत्यय येत नाहीं अशी गोष्ट बोलणें हें ते वमनाप्रमाणें मानीत. या बाबतींत समर्थ हल्लींच्या काळांतील नवीन विचारास अत्यंत अनुकूल होते, हें दिसून येईल. त्यांचा दुसरा विशेष म्हणजे, राजकारण हा प्रत्येक व्यक्तीचा धर्म आहे असा उपदेश त्यांनीं केला. त्यांच्या वेळचें राजकारणाचें स्वरूप व व्याप्ति यांत हल्लींच्या काळांत महदंतर पडलें आहे. परंतु जो उपदेश हल्लीं सर्वमान्य होत आहे तो उपदेश त्यांनीं तीनशें वर्षांपूर्वी केला ही अत्यंत आश्चर्य करण्यासारखी गोष्ट आहे व हा उपदेश सर्वांनीं नेहमीं लक्षांत ठेवण्यासारखा आहे. समर्थांचा तिसरा विशेष म्हणजे, त्यांची समाजाकडे पाहण्याची व समाजसेवेची दृष्टि. समाजाच्या सेवेची जी दृष्टि हल्लींच्या ग्रंथांत पाहण्यास सांपडते तीच दृष्टी श्रीसमर्थांच्या ग्रंथांत दृष्टीस पडते. परंतु यांत हि विशेष असा कीं, हा समाजसेवेचा उपदेश त्यांनीं अध्यात्माच्या भूमिकेवरून केला आहे. समाजाकडे पहाण्याची त्यांची दृष्टि संघटनात्मक होती. केवळ व्यक्तिनिष्ठ नव्हती. जनार्दन हा जनतेच्या ठिकाणीं वास्तव्य करतो हें तत्त्व त्यांनीं सांगितलें. जनतेची सेवा म्हणजे च जनार्दनाची सेवा हें समीकरण त्यांनीं दिखविलें. आत्मा हा एक आहे व निरनिराळ्या व्यक्तींचीं शरीरें हीं त्या एका देवाचीं देवळें आहेत व या देवळांची सेवा करणें म्हणजे च त्या एका देवाची सेवा करणें असें व्यक्तीचें सामाजिक स्वरूप व समाजसेवेचें आध्यात्मिक स्वरूप त्यांनीं वर्णन केलें आहे.

श्रीसमर्थांच्या उपदेशाचा आणखी एक विशेष दासबोधांतील दशक १ समास ४ मध्यें आपणांस पाहावयास सांपडतो. मनुष्यानें प्रत्येक व्यवहारांत जाणून वागावें हें त्या उपदेशाचें सार आहे. व या जाणण्याचें महत्व किती याचें त्यांनीं परोपरीनें वर्णन केलें आहे. मनुष्याची प्रगति जाणून वागण्यावर कशी अवलंबून आहे व न जाणल्यानें तो कसा अधोगतीस जाईल याचें अत्यंत समर्पक वर्णन वरील समासांत आहे. या उपदेशाचें महत्व व व्याप्ति हल्लींच्या काळीं किती वाढली आहे, हा जाणण्याचा व जाणून वागण्याचा प्रांत हल्लीं किती विस्तीर्ण झाला आहे, हें लक्षांत घेतलें म्हणजे या त्यांच्या उपदेशाचें महत्व अधिक सांगण्याचें कारण नाहीं.

सारांश, श्रीसमर्थ हे मोठे साधु होते इकडे च दृष्टि गेल्यामुळें त्यांच्या उपदेशांतील वैशिष्ट्य आपण लक्षांत घेत नाहीं. वरील कारणांशिवाय श्रीसमर्थ-वाङ्मयाचा अभ्यास दुसऱ्या एका दृष्टीनें जरूर आहे. हल्लींच्या काळांत जागतिक परिस्थितीचा पेंच प्रत्येक मनुष्यास जाणवत आहे. या परिस्थितींत निर्माण होणारे प्रश्न संघटनेच्या द्वारें सोडविण्याचा सर्व राष्ट्रांचा प्रयत्न चालू आहे. परंतु या संघटनेच्या काळांत प्रत्यक्ष व्यक्तीकडे यावें तितकें लक्ष दिलें जात नाहीं. संघटना किती हि अवश्य असली तरी अखेर व्यक्ति हें च तें कार्य करण्याचें अंतिम साधन आहे व व्यक्तीचा विकास हें च या सर्व कार्याचें अंतिम ध्येय आहे. या गोष्टीकडे जितकें लक्ष यावें तितकें दिलें जात नाहीं. परिस्थितीच्या पेंचामुळें व्यक्तीस आत्मचिंतन करण्याची शांति लाभत नाहीं. व्यक्तीच्या विकासाचा अत्यंत श्रेष्ठ मार्ग आर्यसंस्कृतींत सांगितला आहे व या आर्यसंस्कृतीचे आपणांस नजीकचें व आपणांस समजेल अशा भाषेंत सांगितलेलें, व जवळ जवळ हल्लींच्या परिस्थितीस अनुरूप असलेलें अत्यंत श्रेष्ठ व अधिकारी स्वरूप श्रीसमर्थ वाङ्मयांत आपणांस पहावयास सांपडतें. आपल्या संस्कृतीचें रक्षण सुदाम प्रयत्न केल्याशिवाय होणें शक्य नाहीं व श्रीसमर्थवाङ्मयाच्या अभ्यासाच्या द्वारें च हा प्रयत्न सार्वत्रिक होणें शक्य आहे व याकरितां श्रीसमर्थवाङ्मयाचा अभ्यास जितका सार्वत्रिक व जितका दृढ होईल तितका करणें हें प्रत्येक विवेकी पुरुषाचें श्रेष्ठ कर्तव्य आहे; व श्री. देव यांच्या प्रयत्नांत सर्वांनीं त्यांच्याशीं सहकार्य करावें अशी आमची आग्रहाची विनंति आहे.

पुणें–ता. २७–४–१९४०

## ( ९ )

# श्रीसमर्थांचा यत्नवाद

( लेखक — रा. गणेश सदाशिव अळतेकर,

एम्. ए., एल्एल्. बी., कऱ्हाड )

तत्वज्ञानाची निवासभूमि ह्मणजे व्यवहाराची विनाशभूमि आणि वेदांताचा अभ्यास ह्मणजे व्यवहारज्ञानाचा ऱ्हास अशी कांहीं लोकांची समजूत आहे. जग हें नश्वर असून आपलें आयुष्यही क्षणभंगुर आहे, तेव्हां ऐहिक सुखाची पर्वा न करितां सर्व काळ ईशचिंतनांत घालावा, इहलोकींचें वैभव हें मायिक असून त्याच्या पाठी-मागें लागल्यास शेवटीं दुःख हें निश्चित प्राप्त होणारें असल्यामुळें या वैभवाची आस सोडून फक्त परमेश्वराचा ध्यास घ्यावा, असा आपल्या तत्वज्ञानाचा निष्कर्ष असल्यानें व सर्व साधुसंतांनीं देखील याचप्रमाणें उपदेश केल्यामुळें आपल्या समाजास पङ्गुपणा आला आहे असा भारतीय तत्वज्ञानावर कित्येकांचा आक्षेप आहे. पुनर्जन्माचा सिद्धांत हा एक हिंदु तत्वज्ञानाचा विशिष्टपणा असून या तत्वानुसार मागील जन्मांतील कर्मांचीं फळें या जन्मीं भोगलीं च पाहिजेत, प्रारब्ध कर्माच्या भोगाशिवाय त्यांतून सुटका नाहीं, तेव्हा हरीवर हवाला ठेवून नशिबीं असेल तें निमुटपणें सोसावें आणि अनित्य व चंचळ ऐश्वर्याच्या मागें लागूं नये, अशी वेदान्ताची शिकवण असल्यामुळें आळसाला उत्तेजन मिळालें आहे, असा वेदान्तावर कांहींचा आरोप आहे. संकटांस तोंड देऊन त्यांच्याशीं झगडून आपलें कार्य नेटानें पार पाडण्याचा प्रयत्नवाद वेदान्त प्रतिपादीत नसल्यामुळें आपला समाज दैववादी बनून दुबळा झाला आहे असें ह्या आक्षेपकांचें म्हणणें आहे. सदर्हु आक्षेपांत कितपत तथ्य आहे याचें आपल्यास श्रीसमर्थांच्या शिकवणीवरून परीक्षण करावयाचें आहे.

जग हें परमार्थदृष्ट्या मायिक असलें तथापि त्यामुळें जोंपर्यंत मनुष्यांस वागावयाचें आहे तोंपर्यंत व्यवहारदृष्ट्या तें त्यास सत्यच आहे. सर्वसामान्य मनुष्यांस वेदान्त प्रपंच सोडून परमार्थ करा असा उपदेश करीत नाहीं. व्यवहार व समाजव्यवस्था याकडे वेदान्त दुर्लक्ष करीत नाहीं. सामान्य मनुष्याच्या मनाची तयारी व समाजाची धारणा याजकडे पूर्ण लक्ष देऊनच शास्त्रकारांनीं आश्रमांची

व्यवस्था घालून दिली आहे. केवळ परमार्थमार्ग हा सामान्य लोकांना आचरण्यास दुर्घट आहे हें जाणून समर्थांनीं '.प्रपंच सांडूनि परमार्थ कराल। तेणें तुम्ही कष्टी व्हाल। ' असा उपदेश केला आहे; व समाजाची सुस्थिति असावी याकरितां 'जो जयाचा व्यापार। तेथें असावें खबर्दार ' असें सांगून ऐहिक व पारलौकिक अशीं दोनीं कल्याणें साधण्याकरितां 'म्हणोनि सावधानपणें। प्रपंच परमार्थ चालविणें। ' असें सांगितलें आहे. प्रपंच व परमार्थ या विषयावरील समर्थांच्या शिकवणुकीचें आपल्यास येथें विवरण करावयाचें नसून आजच्या विषयाच्या प्रतिपादनापूर्वी ऐहिक व पारलौकिक कल्याण हें मनुष्याचें ध्येय आहे हें जाणून च समर्थांनीं प्रयत्न व प्रारब्ध यांचा विचार केला आहे हें निदर्शनास आणावयाचें आहे.

समर्थांना शिष्यानें एकदा प्रश्न केला कीं, या जगामध्यें पहावें तों कांहीं संपन्नावस्थेंत तर कांहीं विपन्नावस्थेंत, कांहीं दुर्बल तर कांहीं समर्थ, कांहीं सुखी तर कांहीं दुःखी, अशा प्रकारचे लोक आढळतात; तर ही विषमता कां असावी? यावर समर्थांनीं उत्तर दिलें कीं, 'हे सकळ गुणापाशीं गती। सगुण भाग्यश्री भोगिती। अवगुणास दरिद्रप्राप्ती। येदर्थी संदेह नाहीं॥' दा. ९६. ज्या मानानें विद्या संपादन करावी, कौशल्य मिळवावें आणि प्रयत्न करावा त्यामानानें कार्यसिद्धि होते. आणि आळसानें याकडे दुर्लक्ष केल्यास करंटपण हें ओघानें च प्राप्त होतें. विद्येशिवाय कार्यक्षमता येत नाहीं व यत्न केल्यावाचून फलप्राप्ति व्हावयाची नाहीं. "जैसा व्याप तैसें वैभव," असा समर्थांचा दंडक च आहे. गुणावांचून गौरव केव्हांही प्राप्त व्हावयाचें नाहीं. यावर साहजीक च असा प्रश्न उपस्थित होतो कीं, प्रत्येक मनुष्यास बरे अगर वाईट असे कांहीं तरी उपजत विशिष्ट गुण असतात च; ज्यांचे ठिकाणीं स्वाभाविक गुणसौष्ठव नाहीं त्यांनीं काय करावें? नैसर्गिक व्यंग च जर असलें तर त्यास कांहीं फारसा इलाज नाहीं. बहिऱ्यास ऐकतां येत नाहीं अगर पङ्गु मनुष्यास चालतां येत नाहीं हा सहज गुण आहे. समर्थ म्हणतात "रूप लावण्य अभ्यासितां नये। सहजगुणास न चले उपाये". वरील सारख्या सहज गुणांचे बावतींत म्हणण्यासारखा उपाय करितां आला नाहीं तरी "कांहीं तरी धरावी सोये। अगान्तुक गुणाची॥" दा. १४६. पांगळा मनुष्य सुद्धां काठीच्या सहाय्यानें आपलें वैगुण्य कमी करतो; आंधळा मनुष्य आपल्या आंधळेपणाची उणीव इतर इंद्रियांच्या अधिक तीक्ष्णतेमुळें शक्य तितकी भरून काढण्याचा प्रयत्न करितो व हल्लीं तर विशेष शिक्षणानें तो वाचूंही शकतो; नैसर्गिक सौन्दर्याची देणगी नसली तरी सौंदर्यसाधनांनीं ह्या बाणीवर देखील ताण केलेली आपण पहात नाहीं काय? तर जे गुण आगन्तुक आहेत म्हणजे अभ्यासानें अंगीं येण्यासारखे आहेत ते प्राप्त करून घेण्याचा मनुष्यानें यत्न केल्यास ते साध्य होणें कठीण आहे काय? एकनिष्ठपणानें व निश्चयानें परिश्रम केल्यास 'अवगुण त्यागिता जाती।

उत्तम गुण अभ्यासिता येती ' हा च अनुभव मनुष्यास आल्यावांचून राहणार नाहीं. दगडाची खपली जर टाकीनें काटली तर ती पुन्हा जडत नाहीं. मनुष्याची योग्यता दगडाइतकी सुद्धां नाहीं काय कीं, एकदां दुर्बुद्धि झाडल्यावर पुन्हा जडूं न देण्याइतकी प्रतिकारशक्ति त्यास कमाविता येऊं नये ? दुर्गुण टाकून सद्गुण संपादन करून उत्तम प्रकारची कार्यक्षमता अंगीं आणल्यावर मनुष्यास चिकाटीच्या प्रयत्नानें आपल्या कार्यांत यश आल्याशिवाय राहणार नाहीं.

यावर पुनः असा प्रश्न उपस्थित होतो कीं, मनुष्यानें आपल्याकडून पुष्कळ खटपट करून प्रयत्नाची शिकस्त केली तर त्याला खात्रीनें यश मिळतें असा च नेहमीं अनुभव जगामध्यें येतो असें नाहीं. पुष्कळ परिश्रम करून सुद्धां शेवटीं अपयश बऱ्याच वेळां मनुष्याचे वाट्यास येतें असें आपल्या नजरेस येत नाहीं काय? तेव्हां प्रयत्नानें कार्यभाग साधतो या ह्मणण्यांत कांहीं तथ्य नाहीं. दैव च जर अनुकूल असेल तर फलप्राप्ति होईल; एरवी होणार नाहीं. ज्याच्या त्याच्या प्रारब्धाप्रमाणें ज्याला त्याला सुखदुःख मिळत असतें. प्रारब्ध कांहीं कोणास बदलतां यावयाचें नाहीं, तर मग निष्कारण यत्न करण्याचा उपद्व्याप करून शेवटीं शीण करून घेण्यांत काय अर्थ आहे ? नशिबामध्यें असतील तर सर्व सुखें आपोआप प्राप्त होतील, आणि दैव च जर प्रतिकूल असेल तर त्यापुढें कशाचा च इलाज चालणार नाहीं. सुखदुःख हें प्रारब्धाधीन आहे, प्रयत्नाधीन नाहीं.

दैववाद्याचें ह्मणणें व त्यावर उत्तर हें संवादरूपानें ओव्या शतक बारावें ह्यामध्यें समर्थांनीं सुंदरपणें दिलें आहे. तें सबंध शतक वाचकांनीं एकवार तरी मुळांतून वाचावें अशी त्यांना विनंति आहे. ' होत नाहीं प्रेत्नें ऐसें काय आहे ' असा प्रयत्नवाद्यानें प्रश्न केल्यावर ' होणार टळेना कांहीं केल्या ' असें दैववादी त्यास चिम्मेपणानें उत्तर देतो. त्यावर यत्नवादी म्हणतो कीं, प्रारब्धानें जें कांहीं मिळावयाचें असेल तें आपोआप मिळतें अधिक मिळत नाहीं अशी जर तुझी खात्री आहे तर भोजनाकरितां सामुग्री मिळविण्याची तरी तसदी कशाला घेतोस ! " होत नाहीं जरी कां यत्न करीसी । खातो जेवितोसी कासयासी ॥ निश्चयेंसी आतां होणार म्हणसी । कांहीं च यत्नासी करूं नको ॥ " दैवानें आपोआप जर जें मिळावयाचें तें मिळणार आणि व्हावयाचें तें होणार तर खाण्यापिण्याकरितां तरी हातपाय कां हालवावेत ? भूक लागल्यावर ती शमविण्याकरितां बुद्धिपुरःसर तुम्ही भोजन करिता. बसल्या ठिकाणीं अन्न कांहीं आपोआप चालून येत नाहीं. त्याकरितां मुद्दाम जेवणघरांत जाऊन पानावर बसून आपल्या हातानें मुखांत घास घालून तो चावून खाल्ल्याशिवाय पोटांत जात नाहीं; असें आहे तर होणार तें आपोआप होतें हें म्हणणें व्यर्थ आहे. दैवानें वस्तु अकस्मात प्राप्त होते असें जरी क्षणभर मानलें तरी ' अकस्मात तरी प्रेत्नें च

भोगील । आळशी पडेल सावकाश ॥ ' यावर दैववादी ह्मणतो जसे प्रारब्धानें भोग आपोआप चालून येतात तसा त्यांचा प्रारब्धानें भोगही घडतो, जें कांहीं कपाळावर लिहून ठेविलें असेल त्यापलीकडे कांहीं एक होणार नाहीं. यावर यत्नवादी विचारतो, ' नाहीं नाहीं ऐसें त्वां तरी देखीलें । कपाळ वाचीले कोणेपरी ॥ ' कपाळावर लिहिलें त्यापलीकडे कांहीं होणार नाहीं असें ह्मणता, पण, कपाळावर काय लिहिलें हें तरी कोणास सांगतां येईल काय ? जें वाचतां येणें शक्य नाहीं त्यापलीकडे कांहीं घडणार नाहीं असें ह्मणण्याचा काय उपयोग आहे ?

बरें, प्रारब्ध अगर पूर्वदत्त म्हणजे तरी काय आहे याचा विचार केला आहे कां ? ' पूर्वदत्त केलें यत्न करूनिया । वाउगेंची वाया बोलतोसी ॥ ' गेल्या जन्मीं जें सुकृत अगर दुष्कृत केलें असेल त्याचें च फळ म्हणजे ह्या जन्मीचें प्रारब्ध ना ? म्हणजे आजचें जें प्रारब्ध तो पूर्वीचा प्रयत्न च होय. थोर आणि लहान हें जाणण्याची दुसरी एक कसोटी म्हणजे ' आधीं जें निर्माण तेंची थोर ' आणि आजच्या प्रारब्धाचा जनक पूर्वीचा प्रयत्न असल्यामुळें ' प्रेत्न झाला आधीं म्हणोनिया थोर ' हें स्पष्ट च आहे. अर्थात् बरें अगर वाईट, भाग्य अगर दुर्भाग्य, सुदैव अगर दुर्दैव याला कारण म्हणजे स्वतःचा प्रयत्न च होय. ' आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ' हा च अखेरचा सिद्धान्त होय. मागील जन्मीची क्रिया जें प्रारब्ध त्यावर ह्या जन्मीच्या प्रतिक्रियेचा परिणाम कां होऊं नये ? ' दैव होणाराला पालटीना ' असें म्हणतां तें चुकीचें आहे. " पालटीना दैव ऐसें ह्मणों नये । दैवची उपाय भक्तजना ॥ " पूर्वी योग्य अगर अयोग्य उपाय केले होते म्हणून त्यांचा आतां बरा अगर वाईट परिणाम होत आहे; ह्यावरून प्रयत्नाचें फळ त्याच्या स्वरूपाप्रमाणें केव्हांही मिळाल्याशिवाय रहात नाहीं हें च सिद्ध होत नाहीं काय ? आपलें कल्याण करून घ्यावयाचें असेल तर यापुढें तरी चांगला प्रयत्न करणें जरूर आहे.

' यत्नाचा लोक भाग्याचा । यत्नेवीण दरिद्रता ॥ ' स्फु. श्लो. ११ असा समर्थांच्या शिकवणींतील एक महत्वाचा धडा आहे. कोणतेंही कार्य घ्या, तें क्षुल्लक असो अगर महत्वाचें असो, तथापि योग्य प्रयत्न केल्याशिवाय तें कधींही सिद्ध व्हावयाचें नाहीं. उद्योगामध्यें ढिलाई अगर आळस झाला कीं कार्यभाग बुडतो हें काय नव्यानें सांगावयास पाहिजे ? ' निद्रा आळस दुश्चितपण । हें चि मूर्खाचें लक्षण । ' मूर्ख ह्मणजे ह्या तीन गुणांची साक्षात् मूर्ति होय. या तीनीपैकीं कोणतेंही एक लक्षण कार्याची हानी करण्यास पुरेसें आहे. हीं लक्षणें एकवटली ह्मणजे विचार आणि यत्न यांची कायमची हद्दपारी होऊन इष्टप्राप्तीची अल्प सुद्धा आशा बाळगावयास नको. आळस हें करंटपणाचें आद्य लक्षण होय असें समर्थांचें सांगणें आहे. ' आळसें सुख वाटे तें । दुःख ब्रह्मांड भोगवी ॥ '

काम करण्याचें चुकवितांना त्या वेळेपुरतें बरें वाटतें, परंतु, हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, त्यायोगानें ' पूर्वी गोड अंतीं शोक । नेमस्त आहे ॥ ' अखेर कल्याण व्हावें अशी जर इच्छा असेल तर प्रथम कष्ट सोसण्यास तयार झालें पाहिजे. ' आधीं कष्ट मग फळ । कष्ट चि नाहीं तें निष्फळ । ' असें आपण सामान्य कार्ये करतांना जर पाहतों, तर कोणतेंही महत्कार्य साधावयाचें असल्यास किती कष्ट सोसावयास पाहिजेत? कष्टाकडे पाहून नाक मुरडण्याचें सोडून उलट कष्ट करण्यामध्यें च आनंद वाटावा इतकी आपली मनोवृत्ति तयार झाली पाहिजे. श्रम करून सुद्धां शेवटीं यश मिळत नाहीं असें जे आपण सृष्टीमध्यें वेळीं वेळीं पाहतों त्याचें कारण शोधूं गेल्यास असें आढळून येईल कीं, ' अचुक येत्न करवेना । म्हणौन केलें तें सजेना । ' दा. १२६. प्रयत्न करण्यामध्यें चूक होते ही गोष्ट लक्षांत येत नाहीं आणि मग ' कष्टी होऊनिया शेवटीं । प्रारब्धावरी घालिती ॥ ' आपण योग्य यत्न केला नाहीं हें न पाहतां शेवटीं लोक दैवास नांवें ठेवीत बसतात. चूक कोठें होते आहे व यत्नाची योग्य दिशा कोणती हें समजण्याची विवेकदृष्टि पाहिजे.

समर्थांचा यत्नवाद म्हणजे उगीच कांहीं तरी एकसारखें करीत रहा असें सांगणारा नाहीं. आपल्यास काय साध्य करावयाचें आहे हें ठरविल्यानंतर त्याचीं बरोबर साधनें कोणतीं आहेत तें समजलें पाहिजे. ' न जाणतां कोटीवरी । साधनें केली परोपरी । तरी मोक्षास अधिकारी । होणार नाहीं ॥ ९६८. जें मोक्षाचे बाबतींत तेंच इतर ध्येयें साधण्याच्या प्रयत्नासही लागू आहे. योग्य साधनें कोणतीं हें न जाणतां जर वाटेल तितके परिश्रम भलत्या च मार्गानें केले तर त्यांचा काडीइतका देखील उपयोग होणार नाहीं. ' जाणत्यास कळे धर्म । नेणत्याचें खोटें कर्म । ' ९३६. धर्म समजण्याची पात्रता आली कीं, अचूक यत्न करणें शक्य होतें. ही पात्रता येण्याकरितां आपल्या विवेक-शक्तीचा विकास करावयास पाहिजे. योग्य अथवा अयोग्य गोष्ट जाणून तिचा स्वीकार अगर त्याग करण्याची विवेचक बुद्धि ही जन्मतः च मनुष्यास परमेश्वरानें दिली आहे. परंतु, अभ्यासानें तिची वाढ करून तिच्यांत अलौकिक सामर्थ्य आणणें हें ज्याच्या त्याच्या प्रयत्नावर अवलंबून आहे. ' वन्ही तो चेतवावा रे । चेतवीतां चि चेततो ॥ ' अग्नीची ठिणगी जरी आकारानें अगदीं क्षुल्लक असली तरी तिजवर सर्पण घालून फुंकल्यास वाटेल तेवढा अग्नि प्रज्वलित करितां येतो आणि त्यापासून आपल्यास पाहिजे तेवढा कार्यभाग करून घेतां येतो. त्याचप्रमाणें ' विवेक जाणिजे तैसा । वाढवीतां चि वाढतो ॥ ' परमेश्वरानें मनुष्य प्राण्यास जी बुद्धि दिली आहे तिच्यावर जर योग्य संस्कार केले तर तिची अमर्याद वाढ होऊं शकते. एकान्तवास करण्याचा समर्थांनीं जो वारंवार उपदेश केला आहे तो विवेक प्रबळ करण्याकरितां च होय. ' जयास एकान्त मानला ।

अवघ्या आधीं फळें झाला । ' अखंड एकांतसेवनानें विवेकाला सारखी चालना दिली असतां त्याच्या ठिकाणीं इतका प्रखरपणा व व्यापकपणा येतो कीं, ' विवेकामध्यें सांपडेना । ऐसे तो कांहीं च असेना । ' अशी स्थिति येऊन कोणताही विषय अगम्य होत नाहीं. त्याप्रमाणें बुद्धीला कुशाग्रता आणि व्यापकपणा प्राप्त झाला असतां अचूक उपाय शोधून काढणें शक्य होतें आणि त्या मार्गानें यत्न केल्यास यशप्राप्तीची निश्चितता येते. प्रयत्न ही मोठी शक्ति आहे पण तिला योग्य मार्ग दर्शविणारी विचाराची दृष्टि पाहिजे. प्रयत्नाला विचाराची मार्गदर्शकता असल्याखेरीज तो सफळ होणें शक्य नाहीं. 'मुख्य यत्न विचाराचा' (स्फु. श्लो. २१२) आणि 'अचूक यत्न तो देवो । चुकणें दैत्य जाणिजे ॥ ' ( स्फु. श्लो. ३१ ) असें सांगतांना प्रयत्नाच्या पाठीमागें विवेकाचें अधिष्ठान पाहिजे याची जाणीव समर्थांनीं वारंवार करून दिली आहे. ' धाडसनि अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्माण्डाहूनि जाड ' आणि ही पात्रता व सामर्थ्य प्राप्त झाल्यावर यत्न केला असतां ' तेथें कैचें आणिलें द्वाड । करंटपण ॥ ' करंटपण ओघानें च अस्तास जाऊन भाग्याचा उदय होतो.

कार्यसिद्धीकरितां पांच कारणांचा विचार गीतेमध्यें सांगितला आहे:-

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।
विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम् ॥ १४

अधिष्ठान म्हणजे जागा, प्रत्यक्ष कार्य करणारा, निरनिराळ्या प्रकारचीं साधनें, अनेक प्रकारचे व्यापार आणि दैव अशीं हीं पांच कारणें आहेत. कोणत्याही कार्यांत यश येण्याकरितां तें हातीं घेणाऱ्यानें आपल्या अंगांत तें कार्य करण्याची पात्रता आणली पाहिजे, अवश्य तीं साधनें मिळविलीं पाहिजेत, त्या कार्यास अनुकूल असें स्थळ निवडलें पाहिजे व दूरतन्हेची खटपट केली पाहिजे. इतकें करूनही कांहीं अज्ञात अगर अनपेक्षित कारणानें म्हणजे दैवानें कार्यहानी होऊं शकते. समर्थांच्या यत्नवादांत या सर्व कारणांचा विचार आला आहे. दैवावर हवाला ठेवणारे लोक सर्वत्र आढळून येत असल्यानें त्यावरील त्यांची अंधश्रद्धा उडविण्याकरितां समर्थांनीं जोराचा आघात केला आहे. मात्र दैव म्हणजे अदृष्ट कारण याजकडून अचानकपणें धोका येण्याचा संभव असल्यानें त्यांनीं सावधानतेची सूचना वारंवार दिली आहे:-

देशकाळ वर्तमान । सर्वही अवेवधान ।
कोणते विधी विधान । सावधान सावधान ॥

ज्या मानानें विवेकशक्ति वाढेल, प्रभावी साधनें आपल्यास शोधून मिळवितां येतील आणि योग्य खटपट करितां येईल त्या मानानें पांचवें कारण जें दैव त्याची ढवळाढवळ होत जाईल. **सावधानतापूर्वक विवेकमूलक प्रयत्न ही यशाची**

गुरकिल्ली आहे असा समर्थांच्या शिकवणीचा निष्कर्ष आहे. पारतंत्र्यांत पिचत पडून आपल्या सामर्थ्याची विस्मृति पडलेल्या आणि उद्धाराचा मार्ग न दिसल्यानें हताश झालेल्या जनतेला ' सकळ जगदांतरीचा देव । क्षोभता रहाया कोठें ठाव । जनाविगळा जनासी उपाव । आणीक नाहीं ॥ ' अशी संघटनेच्या सामर्थ्याची जाणीव करून देऊन कर्तृत्वोन्मुख करणाऱ्या समर्थांइतका कडा यत्नवादी आपण शोधूं गेलों तरी दुसरा मिळेल कीं नाहीं याची शंका च आहे. पुरश्चरणाच्या जोरावर आत्मिक बल वाढवून, सर्व देशभर फिरून तत्कालीन परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करून, अखंड एकांत सेवून परिणत केलेल्या विवेकानें राष्ट्रोद्धाराचा मार्ग घडून, लोकामध्यें जागृति उत्पन्न करून व चैतन्य ओतून त्यांच्या करवी स्वधर्म व स्वराज्याचा झेंडा उभारणाऱ्या या समर्थांची अशी शिकवण आहे कीं:-

केल्यानें होत आहे रे । आधीं केलें चि पाहिजे ।
येत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ॥

स्फु. श्लो. ६

यत्नाची थोरवी सांगण्याची येथें सीमा झाली. सावधानतेचें कवच आणि विवेकाची दृष्टि देऊन दुर्धर्ष बनविलेला असा यत्नवाद अन्यत्र क्वचित् च प्रतिपादलेला आढळेल.



( १० )

# समर्थप्रतापांतील समर्थ

( लेखक — रा. जनार्दन सखाराम करंदीकर, पुणें )

श्रीरामदासस्वामींची आतांपर्यंत अनेक चरित्रें लिहिलीं गेलीं आहेत आणि यापुढें हि आणखी किलेक लिहिलीं जातील, पण त्या सर्वांत **समर्थप्रताप** ग्रंथाची सर इतर कोणत्या हि चरित्रास यावयाची नाहीं. समर्थांची शिष्या **वेणाबाई**, त्या वेणाबाईची शिष्या **बाइयाबाई** आणि त्या बाइयाबाईचे शिष्य **गिरिधर** स्वामी होत. यांचा जन्मशक अज्ञात आहे, पण समाधिशक १६५१ हा निश्चित आहे. गिरिधरांनीं स्वतः समर्थांना पाहिलें होतें, सज्जनगडावर कांहीं दिवस वास्तव्य केलें होतें, समर्थांच्या अनुज्ञेनें तेथें एकदा कीर्तन हि केलें होतें. यावरून समर्थांच्या समाधिकालीं गिरिधरांचें वय २० वर्षांचें तरी निदान असावें. गिरिधरांनीं समर्थांचें चरित्र स्वतः पाहिलें आणि समर्थांजवळ च अनेक वर्षे राहिलेल्या शिष्यवर्गाकडून ऐकिलें आणि हें सर्व चरित्र त्यांनीं आपल्या समाधिकालापूर्वी **समर्थप्रताप** या ग्रंथांत पद्यरूपानें लिहून ठेवलें; या मुळें या ग्रंथाचा प्रामाण्याच्या दृष्टीनें वरा च वरचा नंबर लागतो. या करितां च '**समर्थप्रतापांतील समर्थ**' कसे दिसतात हें आपणास पाहावयाचें आहे. अलीकडील समर्थसांप्रदायिकांनीं रामदासांचे नसते देव्हारे माजविले आहेत आणि नसत्या गोष्टींचें श्रेय ते रामदासांना देऊं पाहतात, असे जे आक्षेप आहेत त्यांना **समर्थप्रताप** ग्रंथांत स्थान मिळूं शकत नाहीं. कारण तो ग्रंथ बीड येथील मठांत एकांत स्थळीं केवळ रामकथाचिंतन आणि समर्थचरित्रवर्णन याहून अन्य कांहीं व्यवसाय न करणाऱ्या, आणि राजकारणापासून अगदीं अलिप्त असलेल्या अशा एका महंतानें, पेशवाईची भरभराट होण्याच्या आधीं च, म्हणजे ब्राह्मणब्राह्मणेतर वादाच्या मूळ उगमाच्या हि आधीं च लिहिलेला आहे. अशा महंतानें समर्थांच्या चरित्रांत वर्णिलेल्या कथा अत्यंत विश्वसनीय असल्या पाहिजेत, अर्थात् च अद्‌भुत चमत्कारांच्या कथा त्या वेळचे श्रद्धाळू शिष्य शब्दशः खऱ्या मानीत, त्यामुळें तसले चमत्कार वगळून इतर वर्णन ऐतिहासिक सत्य

मानण्याला मुळीं च हरकत नाहीं; यास्तव आतां समर्थ प्रतापावरून समर्थ कसे दिसतात तें पाहूं.

समर्थप्रतापग्रंथांतील वचनांवरून च आपणास समर्थचरित्र पहावयाचें आहे. मात्र तें चरित्र पाहतांना समर्थप्रतापांतील मूळ वचनांचा अर्थ नीट लावला पाहिजे. हा अगाऊ इषारा देण्याचें कारण एवढें च कीं, कवींचे कांहीं संकेत ठरलेले असतात, कांहीं सांप्रदायिक परिभाषा ठरलेली असते, कांहीं विशिष्ट समजुती रूढ असल्यानें त्या न सांगतां गृहीत मानल्या जातात. या सर्व गोष्टी आणि वर्णनांतील पूर्वापार संबंध लक्षांत घेऊन नीट अर्थ केल्यास समर्थांचें चरित्र तत्कालीन शिष्यास कसें दिसलें तें आपणास कळून येईल.

सांकेतिक भाषेचा मासला म्हणून एकाच ओवीचा उल्लेख केल्यास पुरें आहे. ' समर्थे आकारपूर्वक यवनासि मारविले ' या ओवींतील ' आकारपूर्वक ' हा शब्द तात्कालीन संकेताप्रमाणें योजला आहे. त्या वेळच्या कागदपत्रांत ' सकारपूर्वक ' म्हणजे ' सखाराम बापू ', ' मकारपूर्वक ' म्हणजे ' मल्हारराव होळकर ' असे संकेत रूढ असत. त्यास अनुसरून ' आकारपूर्वक यवन ' म्हणजे ' आफझलखान ' असा च अर्थ होतो; यांत शब्दाची ओढाताण केली असें मानण्याचें कारण नाहीं.

समर्थप्रतापांत ' समुदाय ' हा शब्द ' जनता ', ' लोक ' या अर्थानें आला आहे. ' व्यष्टि ' या शब्दाच्या उलट जसा ' समष्टि ' शब्द, त्या च सारखा ' व्यक्ति ' शब्दाच्या उलट ' समुदाय ' शब्द योजिलेला आहे.

याच्याहि पेक्षां विशिष्ट अर्थानें वारंवार येणारा शब्द म्हणजे ' **जगदोद्धार** ' हा होय. हा शब्द समर्थप्रतापांत दहावीस वेळां तरी आला आहे आणि त्या त्या ठिकाणच्या संदर्भावरून त्याचा अर्थ **ऐहिक लोककल्याण** असा च होतो. केवळ पारमार्थिक दृष्ट्या तो शब्द वापरलेला नाहीं. सांप्रदायिक गुरूपदेश देऊन संसारांतून उद्धार करून मोक्षपदाला नेणें या अर्थानें तो शब्द वापरलेला नाहीं. ' चिंता करिती विश्वाची ' यांत, किंवा ' कैसीं ब्राह्मण्यें वांचतील ' यांत ज्या प्रकारची लोकसमूहाची चिंता दर्शविली आहे, तसल्या चिंतेंतून पार पाडणें असा च अर्थानें ' जगदोद्धार ' ' विश्वोद्धार ' इत्यादि शब्द समर्थप्रतापांत योजिलेले आहेत.

समर्थांच्या बाळपणीं सामुद्रिकानें त्यांचा हात पाहून जें भविष्य सांगितलें तें असें—

> बापा स्वस्ति साम्राज्यें वैराज्यें भोगिसी ।
> येकीयेकछत्री रामराज्य करिसी ।
> विश्वजनासी तू उद्धरिसी । काय बोलो प्रताप ॥ २–११

यांत समर्थांचें अवतारकार्य काय याचा व्यापक निर्देश केला आहे. त्यांतली अतिशयोक्ति वगळून अर्थ लावला तर स्वराज्यस्थापना व स्वधर्मस्थापना करून लोकांचा उद्धार करावा हें समर्थांचें उद्दिष्ट होतें हें निर्विवाद दिसून येतें.

रामदासांनीं लग्नमंडपांतून प्रयाण केले त्या वेळीं श्रीरामांनीं त्यास आज्ञा काय केली ती पहा—

समर्थें सर्वसंगपरित्याग केला यथार्थ ।
समर्थासी आज्ञा करितील श्रीरामसमर्थ ।
धर्मस्थापना भरतखंडीं कृतार्थ । शुद्ध परमार्थ दिसतसे ॥ २–७१

यांत सर्वसंगपरित्याग शब्दाला 'यथार्थ' हें विशेषण लावून खरा 'सर्वसंग-परित्याग' करणें म्हणजे लोकसमुदायापासून दूर हिमालयांत जाऊन राहाणें असें नसून लोकसमुदायांत च राहून 'धर्मस्थापना' करावयाची, लोकांना धर्माचरण करावयाला लावावयाचें आणि तसें करणें हा च 'शुद्ध परमार्थ' होय, एरवींचा व्यक्ति पुरता परमार्थ हा 'अशुद्ध' परमार्थ होय असें सुचविलें आहे.

समर्थप्रतापकारांनीं आद्य श्रीशंकराचार्य आणि समर्थ यांची तुलना करून उभयतांत भेद कोणता तें फार मार्मिकपणें सांगितलें आहे.

समर्थअवतार निरोपमा । आचार्यस्वामींची साजे उपमा ।
ब्रह्मचर्याश्रमीं परमहंस महिमा । ब्राह्मण्य रक्षणीं अवतारु ॥ २–९९
ब्रह्मसूत्र आचार्यदेवें रक्षिलें । ब्रह्मारण्य समर्थदेवें संरक्षिलें ।
कलयुगीं संन्यासग्रहण आचार्यें चालविलें । विचारसंन्यास समर्थांचे ॥ १००

शंकराचार्यांनीं परमहंस वृत्ति पत्करली; समर्थांनीं ब्रह्मचर्याश्रम च यावज्जीव चालविला, परंतु त्या आश्रमांत राहून च 'परमहंस' पदाचा महिमा प्रकट केला. उभयतांनीं हि ब्राह्मण्य रक्षण करण्यासाठीं आटोकाट प्रयत्न केले. तथापि उभयतांत एक ठळक भेद होता च. कलियुगांत 'संन्यासग्रहण' वर्ज्य अशी जी खुळचट कल्पना रूढ झाली होती, ती श्रीशंकराचार्यांनीं समूळ उखडून टाकली. समर्थांनीं संन्यास-आश्रमाला महत्त्व दिलें नाहीं. संन्यासांत जी उदात्त कल्पना आहे ती बहुमोल आहे. ती कल्पना विचारांत घेऊन समर्थांनीं बाह्य आचारापेक्षां अंतर्गत विचाराला अधिक महत्व दिलें. म्हणून गिरिधरस्वामी सांगतात कीं, समर्थांचा हि 'संन्यास' होता च, परंतु तो 'आश्रमसंन्यास' नसून 'विचारसंन्यास' होता. गीतेमध्यें ज्याला 'बुद्धियोग' म्हटलें आहे तो च हा 'विचारसंन्यास' होय. यांत आश्रमयोग न करितां विवेकवैराग्य धारण करून मनानें सर्व 'काम्य कर्मे' वर्ज्य करून 'काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः' या गीतोक्तिप्रमाणें समर्थांचा संन्यास होता.

वैराग्याच्या भरांत समर्थांना हि एकदा तुमता आश्रमत्याग च नव्हे तर स्वदेशत्याग हि करून मोकळें व्हावें असें वाटलें होतें. पण स्वतः श्रीरामचंद्रांनीं समर्थांस परावृत्त केलें आणि सांगितलें कीं,

तुम्हांसी जगोद्धार करणें आहे । तुमची तनु ते आमुची तनु पाहे ।
दोनि तपें तुमची रक्षिली काया हे । धर्मस्थापनेकारणें ॥ ३-८

धर्मस्थापना करावयाची आणि ती कृष्णातीरीं जाऊन तेथें राहून करावयाची हा निश्चितार्थ समर्थांच्या मनांत पंचवटीस तप करीत असल्यावेळेपासून ठरला होता. शिवाजी महाराजांचे प्रताप पाहिल्यावर व ऐकल्यावर समर्थांना राजकारणाची स्फूर्ति उत्पन्न झाली असें म्हणणाऱ्यांनीं समर्थप्रतापांतील वचनें काढून पाहावीं.

समर्थ पंचवटीला जाण्याला निघाले तेव्हां च त्यांनीं सर्व देवतांना सांगितलें कीं,

म्हणताती तुमचें अर्चन करणें आहे प्रभावें ।
पुनरागमन व्हावें कृष्णातीरीं ॥ २-७३

कारण असें भविष्य समर्थांच्या जन्मकाळापासून वर्तविलें गेलें होतें —

ब्रह्मदेवाचें भविष्यवचन । कलयुगीं हनुमान अवतार होईल जाण ।
आपआपणा जागे करुन । जगदोद्धार करील ॥ ३–३९

गौतमीतीरीं उत्पन्न होऊन । कृष्णातीरीं रहावया हें चि कारण ।
श्रीरामअवताराचें अखंड स्मरण । पूर्वाख्यान स्मरतसे ॥ ४०

कृष्णातीरावर आल्यावेळेपासून समर्थांनीं मारुतीची स्थापना करण्याला सुरवात केली-

प्रथम वाहेक्षेत्रीं रामलिंगी मूर्ति स्थापना ।
कृष्णवेणीमध्यें केली विराजमाना ।
मग ठाईं ठाईं सर्व हि हनुमाना । हनुमानस्वामी स्थापिती ॥ ३–४८
हनुमान पुढें ठाईं ठाईं स्थापिले । जगदोद्धार करावया ॥ ३७

हा जगदोद्धार केवळ पारमार्थिक व पारलौकिक नव्हे हें पूर्वी च सांगितलें आहे. तथापि पुनः एकदां समर्थांना लोककल्याणाची चिंता कशा प्रकारची लागली होती ते समर्थप्रतापांतील वचनांवरून स्पष्ट करूं-

श्रीगुरुसमर्थ येकांतीं बैसती । प्रांतींचे लोक दर्शनासी येती ।
सकळ प्रांतींचा स्वामी परामृश घेती । चिंता करिती विश्वाची ॥ २०-५८
देशकाळवर्तमानें । आपण चिंताग्रस्त होती मनें ।

म्हणती कैसी वाचतील जनें । कैसीं ब्राह्मण्यें राहतील ॥ ५९

कैसी क्षेम राहेल जगती । कैसीं देवदेवाल्यें तगती ।
कैसे कुटुंबवत्छळ लोक जगती । कोणेकडे जातील हे ॥ ६०

समर्थांना जी अहर्निश चिंता लागली होती तिचें हें स्वरूप ध्यानांत घेतलें म्हणजे त्यांच्या जगदोद्धाराच्या कार्याचें स्वरूप समजतें.

हा च अर्थ अधिक स्पष्ट होण्याकरितां '**समर्थप्रतापां**'त जेथें जेथें जगदोद्धार, विश्वोद्धार असे शब्द आले आहेत त्या ओव्या च उद्धृत करतों, म्हणजे त्यावरून वाचकांना या अर्थाची निश्चित कल्पना येईल.

जगदोद्धार समर्थे सुचिला पाहे । प्रेतप्राणी उद्धरिला ॥ २–५२

तुम्हासी जगोद्धार करणें आहे । तुमची तनु ते आमुची तनु पाहे ।
दोनि तपें तुमची रक्षिली काया हे । धर्मस्थापनेकारणें ॥ ३–८

समर्थासी जगोद्धार करणें आहे । समर्थतनु ते श्रीरामतनु पाहे । ३–२५

हनुमान पुढें ठाईं ठाईं स्थापिले । जगदोद्धार करावया ॥ ३–३७

कल्युगीं जागी केलीसे जगदोद्धारा ॥ ३–३८

आपआपणा जागे करून । जगदोद्धार करील ॥ ३–३९

नाना गिरिकंधरीं दास विहरे निर्मिले । नाना मठ कराविले लोकोद्धारा ॥ ७–२

सद्गुरु समर्थ भरतखंडीं प्रगटले । जगदोद्धाराकारणें ॥ ८–५३

नाना महंतरूपें विश्वजनासी । भूमंडळीं करिती उद्धारु ॥ ९–५७

मुख्य जगदोद्धार करणें समर्था । शुद्ध विस्तारणें परमार्था । १०–११

कृष्ण नामा तापीपुरीं । उत्कट परमार्थ लोकीं विस्तारी ।
सद्गुरुकृपें जग उद्धरी । यात्रा भरी देवाची ॥ १०–५०

जयराम नामा कुंडलधारी । अनुष्ठाता परमार्थ विस्तारी ।
करनाटकप्रांतें जग उद्धरी । श्रीगुरुस्वामीप्रतापें ॥ १०–५३

जनार्दन नामा सुरतप्रांतीं । समर्थकृपेची करी महंती ।
जगदोद्धरण देखूनि संतीं । प्रेमें माथें डोलविले ॥ १०–६३

श्रीधर नामा श्रीरामभजनी । श्रीगुरुसेवे संकीर्तनी ।
कितेक जगोद्धार करीत जनीं । रामटेकप्रांतें विराजे ॥ १०–६५

भैरव नामा श्रीगुरुभक्त । भक्तिज्ञानवैराग्ययुक्त ।
जगदोद्धारक नित्य मुक्त । गोकर्णप्रांतीं विराजे ॥ १०–६८

शिवराम नामा समर्थसंगे । कितेक दिवस अंतरंगें ।
पुढें पुढें जगदोद्धारणप्रसंगें । तेलंगणप्रांतें आज्ञापिला ॥ १०–६९

असे अनेक उतारे देतां येतील. या सर्व ठिकाणीं **जगदोद्धारण** या शब्दाचा कांहीं विशिष्ट सांकेतिक अर्थ मनांत योजून त्याचा उपयोग केलेला दिसतो. रामटेक प्रांतांत श्रीधर हा शिष्य होता. त्याच्याविषयीं 'कितेक जगोद्धार करीत जनीं' असें वर्णन आहे. त्यांत **जगोद्धार** याच्या मागें कितेक हें विशेषण लावून अनेकवचनीं प्रयोग केला आहे. '**शिवराम**' नामा शिष्य तर नेहमीं समर्थांच्या संनिध राहणारा आणि अंतरंगांतील कारभार जाणणारा; अशाला **जगदोद्धारणप्रसंगें** तेलंगण प्रांतांत मुद्दाम पाठवून दिलें. **जगदोद्धारण** याचा अर्थ जर नुसता पारमार्थिक उपदेश असा असता तर **जगदोद्धारण प्रसंग** प्राप्त झाला म्हणून मुद्दाम तेलंगण प्रांतांत च जाण्याची आज्ञा करण्याचें कारण काय?

असो. यावरून समर्थांच्या महंतांच्या कार्याचा व्याप मोठा होता व त्यांत सर्व च सार्वजनिक हिताच्या कार्यांचा समावेश होत असे आणि अशा सार्वजनिक कार्यांत ज्याला आपण हल्लीं राजकारण म्हणतो तें हि एक अवश्यक अंग असे, हें यावरून सिद्ध होतें.

**जगदोद्धार** हा शब्द **समर्थप्रतापांत** अगदीं व्यावहारिक अर्थानें वापरला आहे, याविषयीं अद्यापि वाचकांच्या मनांत संशय असेल तर त्यांनीं पुढील उतारा पाहावा.

समर्थें हनुमानसामर्थ्य किंचित दाखविलें ।
समुद्रीं जहाज बुडतां जाऊनि धरिलें ।
आंग पुसावया धोत्र आणविलें ।
तेव्हां संतसज्जनासी कळलें हे जगदोद्धारी ॥ १९–६

यांत पारमार्थिक किंवा पारलौकिक कल्याणाचा संबंध मुळीं च नसून केवळ लौकिक कार्यांच्या दृष्टीनें च **जगदोद्धारी** हा शब्द वापरला आहे.

**संप्रदाय** आणि **समुदाय** असे दोन शब्द समर्थप्रतापांत वारंवार आढळतात. या दोहोंतील फरक स्पष्ट आहे. जो शिष्य समर्थांची सर्व शिकवण मान्य करून समर्थपंथाला आपणास सर्वस्वीं वाहून घेई तो 'सांप्रदायिक' शिष्य झाला. पण याशिवाय समर्थांना बहुजनसमुदाय आपल्या विशिष्ट मताकडे

वाढवून घ्यावयाचा होता. असे लोक हे सांप्रदायिक शिष्य नव्हत; अर्थातच त्यांच्यावर विशिष्ट बंधनें हि नसत; पण ते समर्थ-समुदायांत समाविष्ट झाले असे मानले जाई. असा समुदायहि समर्थांना वाढवावयाचा होता. याला च त्यांनीं **समुदायाचा हव्यास** असें म्हटलें आहे. आणि ठिकठिकाणीं **समुदाय कसा सांभाळावा** याविषयीं सूचना दिल्या आहेत. हा समुदाय म्हणजे च लौकिक व्यवहारांतील अनुयायी होत आणि समर्थांचें **राजकारण** असा समुदाय वाढविण्याच्या द्वारें चालत असे.

आपल्या अनुयायांत असे दोन वर्ग असल्याचें स्वतः समर्थ च सांगतात. चाफळचें देवालय मी बांधवून देतो असें शिवाजी राजा म्हणत असतां समर्थ सांगतात–

समर्थ म्हणती शिष्यसमुदाय संप्रदाय माझा ।
देवाल्यें करवीन अनंत हस्तें ॥ १९–१६

यांत सांप्रदायिक शिष्य आणि सामुदायिक शिष्य मिळून अनंत हस्तांनीं मी देवालय बांधवीन असा उल्लेख आहे.

आधीं लोकांचीं मनें आकर्षून ' समुदाय ' वाढवावा आणि मग त्या समुदायांतून निवड करून ' संप्रदायांत ' शिष्याचा समावेश करावा असा समर्थांचा क्रम असे. स्वतः **गिरिधरांना** च असा कानमंत्र समर्थांनीं दिला होता. गिरिधरांना निरोप देतांना समर्थ सांगतात–

राघवाची भक्ति ग्रंथाचें पूजन । स्वजनशोधन समुदाईं ॥ ६
समुदाईं लोक मर्यादे धरावे । कलयुगीं अवघे अमर्यादी ॥ ७
प्रस्ता. पृ. १६

आधी समुदाय आपल्या भजनीं लावावा आणि मग त्या समुदायांत **स्वजनशोधन** करून आपले खरे खरे शिष्य त्या समुदायांतून शोधून काढावे. समुदायांतील लोकांनीं अमर्यादेनें न वागतां **मर्यादेनें** वागावें एवढें च त्यावर बंधन. सांप्रदायिक शिष्य झाला म्हणजे त्याजवर अधिक बंधनें येणार हें उघड आहे. महंतांनीं असा समुदाय वाढविण्याकरितां लोकांत मिळून मिसळून वागावें व त्यांच्या लौकिक कार्यांची काळजी वाहावी असा समर्थांचा दंडक असे.

लोकांसी उत्तमोत्तम दिसेल तैसें । जनीजनार्दनीं वर्तावें ॥ १२–३९
जनीजनार्दनीं महंतें मिळोनि जावें । सत्कीर्तीनें भरावें भूमंडळ ॥ १२–४०

अशा प्रकारें उभयविध शिष्यसृष्टि वाढत चालल्याची हकीकत समर्थांच्या कानीं येत असे—

एवं शिष्यसृष्टीचीं वर्तमानें । समुदाय संप्रदाय वर्द्धमानें ।
समर्थाचरणीं केलीं निवेदनें । विद्यमान स्वामी ऐकती ॥ १२-४८

मागां शिष्यसमुदायसंप्रदायवर्तमानें । निवेदनें केलीं सेवकानें ॥ १३-१

यांत समुदाय व संप्रदाय असे दोन वर्ग वेगवेगळे स्पष्टपणें निर्दिष्ट केले आहेत.

येथवर हा सामान्य विचार झाला. आतां समर्थांच्या कार्यासंबंधानें आणि राजकारणाचा प्रत्यक्ष संबंध किती आला या संबंधानें **समर्थप्रतापांत** काय सांगितलें आहे तें पाहूं.

समर्थांच्या अवताराचा हेतू च **स्वधर्मस्थापना** हा होता. रामदर्शनानंतर रामचंद्र प्रभूंनीं हि **धर्मस्थापने** करितां तुमचा देह रक्षिला आहे, याकरितां कृष्णातीरीं जाऊन धर्मस्थापना करा असें सांगितलें होतें. स्वधर्माचा राजा असल्याखेरीज धर्मस्थापना होऊं शकत नाहीं. यावरून च **धर्मस्थापने**च्या कार्याबरोबर च **स्वराज्यस्थापना** आली च. म्हणून च

श्रीगुरुसमर्थासी पश्चिम देशीं स्वधर्मराज्य पाळणें ।
श्रीरामराज्य करणें सर्वत्र हो ॥ २०-७२

हें समर्थांचें ध्येय होतें. याकरितां च

नाना देशकाळें प्रसंगें वर्तती । नाना राजयोगें राजकारणें करिती । २१-५२

असें वर्णन समर्थप्रतापांत आहे. या शिवाय प्रत्यक्ष शिवाजी महाराजांचा संबंध समर्थांशीं कसा व किती आला याचें हि वर्णन समर्थप्रतापांत आहे त्याचा यापुढें विचार करूं.

समर्थप्रतापांतील वर्णन कालानुक्रमानें नाहीं, यास्तव तें वाचतांना जरासा गोंधळ होतो; पण तें ज्या क्रमानें आहे त्या च क्रमानें दिलेले बरें.

पराशरपर्वतीं विचित्र वर्तलें । समर्थासी **शिवराजें** भावें विनविलें ।
स्वामी प्रवर्षगिरिवरि येक रात्रीं राहिलें । पाहिजे आतां गुरुदेवें ॥ ३।५०

निके म्हणोनि सोमतीर्थी केलें संध्यावंदन ।
पुढें श्रमासमदनीं जालें कथानुकीर्तन ।
कथा समाप्तीं समर्थें केलें उड्डाण । पर्वतावरुनि स्वानंदें ॥ ५२

**शिवगणासी** परम विस्मय जालें । हनुमानस्वामी प्रत्यया आले ।
अष्ट प्रधान समाधान पावले । आधलें निधान **जगदोद्धारा** ॥ ५३

शिवराजासी वृत्तान्त कर्णोपकर्ण गेले । दर्शनासाठीं डोंगरोडोंगर लागले ।
समर्थदर्शन होय ना उदास जाले । राजकार्य कांहीं सुचेचिना ॥ ६४
शिवराजें शिवतरीं चमत्कार देखिले ।
करतळस्फोटक स्मरणें तात्काळ शमले ।
स्वमीं समर्थ प्रसाद देऊनि गेले । महा नदी उतरूनियां ॥ ६५
कोण्ही राजदर्शनासी अनुष्ठानें करिती ।
समर्थपाईं **राजराजेंद्र** लागती ॥ ६६
समर्थासी सर्वदां पर्वतीं राहाणें । **शिवराजासी** सदां पर्वतदुर्गें बांधणें ।
समर्थदर्शनें माळा छत्रा पावणें । **छत्रपति** होणें स्वामीप्रतापें ॥ ६९
दीर्घदंड नमस्कार घालूनि । चरणपादुका मस्तकीं धरूनि ।
**राज्य पावला क्षत्रिय दाक्षणी** । द्विजराज्य दिधलें समर्थें ॥ ७०
समर्थे **शिवराजाचा** कारभाव पाहिला ।
शिवें वर्जिला तो तांबुल दिधला ।
**शिवगणें** हनुमानरूपें प्रसाद घेतला । मुखांत घातला अविलंबें ॥ ७१
पुढें करनाटक हस्तगत केलें । समर्थध्यान तेथें आठविलें ।
अभिजितीं **येळरीं** दर्शन दिधलें । कृष्णातीरीं तेव्हां समर्थ ॥ ७२
समर्थें गागाभट्टासी दर्शनें दिधलीं । तीन वर्षें दर्शनप्रतीक्षा श्रवणीं ऐकिली ।
**शिवराजपूजेचीं** अकरा सहस्र होनें उडविलीं ।
सुवर्णवृष्टि केली ब्राह्मणावरी ॥ ७–७
**शिवराजासी** आनंद जाले । रायगडीं मोठे उछाह केले ।
नाना दारुयंत्रें घोष गडोगड गेले । प्रतापगडा आले समर्थ ॥ ८
श्रीतुळजादेवीसी नवसफळ वाइलें ।
देवीनें कंठमौक्तिकी श्रवणभूषण दिधलें । ९
**शिवराजासी** समर्थव्रत कळलें । निस्पृह स्वामींचें जटिलें सत्व पाहिलें ।
विवेकेंचि **शिवराजें** समर्थासी विनविलें ।
सैह्याद्रिशिखरीं राहावें गुरुदेवें ॥ ८-१०

सहस्रांकित सदन संकल्प केला । समर्थसदनासी प्रारंभ जाला ।
शिवराजा आज्ञा घेऊन निघाला । सप्तऋषिदुर्गींहूनि आला येक मासे ॥ १२
शिवराजसेवा पंचविंशति नित्य भोजन । समर्थसदनीं अन्नब्रह्मनिवेदन । १४
समर्थदर्शनासी मऱ्हाटे सरदार आले । विजयादशमीसी समर्थ जोहारिले ।
सर्भोवते कंडेपटे साज घोडे उभे केले ।
ज्यावरी स्वार जाले त्याचा भाग्योदय ॥ १८-२२
समर्थें आकारपूर्वक यवनासी मारविलें । मग चांफळक्षेत्र उभें केलें ।
श्रीतुळजामाऊलीसी संस्थापिले । जाउळीपर्वतीं प्रतापगडीं ॥ २६
समर्थस्थळीं चाफळीं ग्रामस्थीं कर मागितला ।
शिवराजें ऐकतां जीवघात आरंभिला ।
प्राणजीचा प्राण रक्षूनि समर्थें अभयंकर दिधला ।
सेवाभाग्य दिधलें चिरकाळें ॥ १९-१५
समर्थ आज्ञा पुसे शिवराजा । श्रीरघुनाथदेवालय मी बांधेन वोजा ।
समर्थ म्हणती शिष्यसमुदाय संप्रदाय माझा ।
देवालयें करवीन अनंत हस्तें ॥ १६
कैलासवासी शिवगणनामें । क्षत्रियकुळावंतसें सप्रेमें ।
मंत्रियानुमतें सेवेसी संभ्रमें । रुद्रसंख्या ग्रामें समर्पिलीं ॥ २०—४
जव जव शिवराज्यवर्धमानें । तव तव रामभजनासी ग्रामप्रदानें ।
राजा ब्रह्म राम अनुसंधानें । राजश्रिया विराजत ॥ ५
समर्थ भविष्य न सांगोनि सांगती । दक्षणेसी युद्धें दुर्धर दिसती ।
अकरा अकरीं तरवारा मागों धाडिती । शिवराजयासी सत्वर ॥ ६१
शिवराजें चिन्ह जाणितलें । दक्षणेसी परचक्र सत्य आलें ।
समर्थें सर्व पराभविलें । स्वयें निजशस्त्रें घेउनियां ॥ ६२
पुढें समर्थ शिवराजयासी लग्न करा म्हणती ।
शिवराज आपुला कैलासमार्ग लक्षिती ।
समर्थासी वंदूनि रायगडासी जाती । कैलासवास करावया ॥ ६३

समर्थ स्वप्रकाशें आंधारीं तीन मास बैसताती ।
मुरूमपात्रें उदकें सेविताति । ६४
उत्तर परचक्र आलें गेलें । दक्षणेसी धर्मसंस्थापना ॥ ६५
श्रीगुरुसमर्थासी पश्चिम देशीं स्वधर्मराज्य पाळणें ।
श्रीरामराज्य करणें सर्वत्र हो ॥ ७२

हे सर्व उतारे इतके सविस्तर विस्तृत देण्यांतला हेतु इतका च कीं, समर्थ आणि शिवाजी यांचा संबंध कांहीं केव्हांतरी एकदा चुकून आला असें नसून त्यांचा संबंध अगदीं निकट प्रकारचा होता. त्याच प्रमाणें समर्थांच्या अवतार-हेतूंत स्वराज्यस्थापना, धर्मस्थापना, रामराज्य करणें या कल्पना आरंभापासून अखेरपर्यंत कायमच्या अंतर्भूत झालेल्या असल्यानें समर्थांचा लौकिक व्यवहाराशीं साक्षात संबंध किती होता तें कळून येतें.

आतां शिवाजी महाराजांशीं समर्थांचा संबंध केव्हांपासून जडला याविषयीं नक्की अनुमान करण्याला उपयोगी पडणारा एक च उतारा देतो--

समर्थे निस्पृह सर्व हि केले । देवें आश्रम कांहीं चालवावे भले ।
शिवराजा आश्रमधर्म आम्ही लौकिकीं चालविले ।
माझे शिष्यसंतान सृष्टिवरी ॥ ८-३३

यांतील भावार्थ असा कीं, समर्थांनीं सर्वसंगपरित्याग केला, हें कौतुकावह झालें च; पण आतां गृहस्थाश्रम स्वीकारून पुत्रसंतति निर्माण करावी, कारण 'अपुत्रस्य लोकोनास्ति' अशी चर्चा समर्थांच्या कानावर जाऊं लागली. तेव्हां समर्थांनीं उत्तर दिलें कीं 'माझे शिष्यसंतान सृष्टिवरी,' माझे शिष्यरुपी संतान पृथ्वीवर संचार करीत आहे.

या शंका प्रतिशंकांचा विचार केल्यास पहिली च गोष्ट लक्षांत घ्यावी लागते कीं, शिष्य हे च माझें संतान, तेव्हां मला पुत्रसंतानाची जरूरी नाहीं; तें कसेंहि असो; पण असें शंका-समाधान केव्हां होणें संभवनीय आहे? समर्थांना साठ वर्षे पुरीं होऊन गेल्यावर, कां चाळीशीच्या पूर्वी? साठी उलटलेल्या माणसाला अशी सूचना कोणी तरी करील काय? यावरून शिवाजी व समर्थ यांचा संबंध रामदास स्वामींच्या वयाची चाळीशी उलटण्याच्या पूर्वीपासूनचा होता, समर्थांच्या वयाला ६४ वर्षे होऊन गेल्यानंतर उभयतांची '**पहिली भेट**' झाली असली विक्षिप्त कल्पना टिकूं च शकत नाहीं हें उघड सिद्ध होतें.

समर्थ जे पळून गेले ते लग्नमंडपांतून च सावधान शब्द ऐकल्यावर निघाले असें निश्चित विधान समर्थप्रतापांत आहे ( पृ. ११ ); तेव्हां याविषयींचीं इतर अनुमानें चूक आहेत. समर्थ पंचवटीस येऊन राहिले तेथें आल्यानंतर अकराव्या दिवशीं च त्यास रामदर्शन व वरप्राप्ति झाली; त्यानंतर त्यांनीं बारा वर्षे तेथें तपाचरण केलें व नंतर बारा वर्षे भरतखंडभर प्रवास केला; याला समर्थप्रतापांत आधार आहे.

समर्थांनीं कऱ्हाड प्रांतांत येऊन अकरा मारुति स्थापन केले, चाफळास रामनवमीचा उत्सव चालू केला; तेथें रामाचें देऊळ बांधविलें. रामाच्या मूर्ति चाफळास स्थापल्यानंतर एकदा त्या मूर्ति पन्हाळगडाजवळच्या पारगांवास उत्सवाकरितां नेल्या होत्या; हा अपवाद सोडून दिल्यास एरवीं सर्व रामनवमीचे उत्सव चाफळास च झाले.

समर्थांनीं अनेक चमत्कार केले असें म्हटलें आहे; त्यांत कड्यावरून खालीं उडी टाकणें, एकदम अदृश्य होणें, एकदम प्रगट होणें, समुद्रांतलें बुडतें जहाज तारणें, सिंहासी झगडा करणें, अकस्मात् भोजनसामुग्री काढून भोजन देणें, नदीच्या पुरांत समाधी धारण करून बसून राहणें इत्यादि चमत्कारांचा उल्लेख आहे. परंतु प्रेत उठविल्याचा, मेलेले प्राणी जीवंत केल्याचा उल्लेख नाहीं.

समर्थांच्या महंतांचीं नांवें यांत आहेत; समर्थांच्या शिष्यांचीं नांवें यांत आहेत, त्यांत कित्येक शिष्य राज्यधारी, कित्येक राज्याधिकारी, कित्येक देशाधिकारी होते, असें म्हटलें आहे. महंतांचीं राहण्याचीं ठिकाणें दिलीं आहेत त्यांत आसेतुहिमाचल सर्व महत्वाचीं स्थळें आहेत. समर्थांचे प्रकट शिष्य अकराशें होते असें म्हटलें असून गुप्त शिष्य किती होते त्यांची गणना च करतां येत नाहीं असें म्हटलें आहे. विशेष गोष्ट ही कीं, शिष्याचे प्रशिष्य, प्रशिष्याचे पुनः शिष्य अशा अका पिढ्या समर्थांच्या हयातींत च झाल्या होत्या, यावरून शिष्यसंप्रदाय किती झपाट्यानें वाढत गेला याची कल्पना येते.

समर्थांनीं केलेल्या दासबोधादि सर्व ग्रंथांचा उल्लेख समर्थप्रतापांत आहे आणि ते सर्व ग्रंथ मिळूं शकतात ही भाग्याची गोष्ट होय. पूर्वारंभ, जुनाट पुरुष, अंतर्भाव, पंचसमासी, मानपंचक, षड्रिपु, इत्यादि प्रकरणांचा यांत उल्लेख आहे आणि **दासबोध** हा मुख्य ग्रंथ असें यांत म्हटलें आहे. याशिवाय अनंत पदें, सवाया, वीर, डफगाणीं, ललितें, श्लोक यांचा हि उल्लेख आहे. पण यांत रामायणांचा उल्लेख नाहीं याचें आश्चर्य वाटतें. आणि मुख्य मुद्द्याची गोष्ट ही कीं, ' आधीं केलें मग सांगितलें ' असा शेरा दासबोध ग्रंथासंबंधानें गिरिधरस्वामींनीं च नमूद करून ठेवला आहे.

समर्थांनीं महंत तयार करावे व त्या महंतांनीं आणखी महंत तयार करावे अशी परंपरा तर अखंड चालली च होती हें सर्वत्रास विदित आहे च. तथापि या महंतांशीं व शिष्यांशीं समर्थांचें हितगुज काय चालत असें याची माहिती फारशी नसते. समर्थप्रतापांत तिचेंहि दिग्दर्शन आहे.

श्रीगुरुसमर्थ येकांतीं बैसती । प्रांतींचे लोक दर्शनासी येती ।
सकळ प्रांतीचा स्वामी परामृश घेती । चिंता करिती विश्वाची ॥ २०-५८

देशकाळवर्तमानें । आपण चिंताग्रस्थ होती मनें ।
म्हणती कैसी वाचतील जनें । कैसीं ब्राह्मण्यें राहतील ॥ ५९

कैसी क्षेम राहेल जगती । कैसीं देवदेवाल्यें तगती ।
कैसे कुटुंबवछळ लोक जगती । कोणेकडे जातील हे ॥ ६०

समर्थांचें शिष्यांशीं हें हितगुज चालत असे, परप्रांतांतल्या शिष्यांनीं तीन वर्षांतून एकदां तरी दर्शनास आलें च पाहिजे आणि आल्या वेळीं प्रांतींचा सर्व समाचार गुरुचरणीं निवेदन केला च पाहिजे असा दंडक असे. त्यावेळीं महंतांची एकप्रकारें कसोटी च लागत असे!

समर्थांच्या शिष्यवर्गांत जरी कांहीं शिष्यिणी होत्या तरी त्यांच्या संबंधानें कडक नियम असत.

स्त्रियादिकांसी दुरूनि गुरुदेवदर्शनें । नीति मर्यादा स्वामीची ॥२०–३९

पुढें समर्थस्वामी आज्ञा करिताती । स्त्रियादिकांसी नीरांजनें वर्जिताती ।
नाना युगधर्म लौकिक स्थिति । मर्यादा राहिली पाहिजे ॥ ४०

यावरून स्वामींचा हेतु स्पष्टपणें लक्षांत येतो.

याशिवाय इतर किती तरी माहिती समर्थप्रताप ग्रंथांत ग्रथित केली आहे. समर्थांचे महंत व शिष्य यांचीं नांवें, त्यांचें वास्तव्य, त्यांची कामगिरी यांची माहिती उपयुक्त आहे च; पण त्याखेरीज समर्थपूर्वकालीन व समर्थसमकालीन साधुसंत व कवि यांचीं नांवें या ग्रंथांत असल्यानें त्यास ऐतिहासिक महत्व प्राप्त झालें आहे. समर्थ तर ' मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण । ' असें साध्यसाधित्र साधून जगदोद्धार करीत च, पण त्याचें महंत व शिष्यहि

नाना देशकाळें प्रसंगें वर्तती । नाना राजयोगें राजकारणें करिती ।
नाना अध्यात्मग्रंथीं विवरणें विवरिती । विवेकविचारें परमार्थें ॥ २१–५२

यांत वर्णन केल्याप्रमाणें परमार्थ आणि राजकारण या दोन्ही गोष्टी प्रसंग ओळखून करीत असत.

येकांतीं नाजूक वर्तमान । मनासी आणिती महंत प्रधान ।

असें दुहेरी कार्य महंतांचें सतत चालू असे.

ऐसे सज्जनपर्वतीं वृत्तान्त वर्तले । श्रीदासबोध सृष्टींत विस्तारले ।

सद्गुरु समर्थ भरतखंडीं प्रगटले । जगदोद्धाराकारणें ॥ ८–५२

यांत समर्थप्रतापकारांनीं समर्थांच्या कार्याचा व्याप व विस्तार वर्णिला आहे तो अगदीं यथार्थ आहे.

अशाप्रकारें समर्थप्रताप ग्रंथांतून आणखी किती तरी साधार माहितीचा विस्तार करतां येईल, पण लेख वाढेल म्हणून संक्षिप्त स्वरूपांत केवळ दिग्दर्शन केलें आहे.

( ११ )

# छत्रपति शिवाजी महाराज

# व

# त्यांचे समकालीन सत्पुरुष

( लेखक - रा. भास्कर वामन भट, धुळें )

छत्रपति शिवाजी महाराज त्यांच्या समकालीन सत्पुरुषांच्या भेटी घेत असत ही गोष्ट स्थूलमानानें सर्वत्रांस विदित आहे. प्रस्तुत निबंधांत याविषयींच्या कारणमीमांसेची अल्प चर्चा करण्याचें योजिलें आहे. ही चर्चा करण्यापूर्वी सत्पुरुष या संज्ञेंत आम्ही कोणाचा समावेश करितों हें सुरुवातीस स्पष्ट करून दाखविणें अगत्याचें आहे. छत्रपति शिवाजी महाराजांच्या काळीं वारकरी सांप्रदायाचे संत शिरोमणी श्रीविठ्ठलभक्त तुकारामबुवा, श्रीरामभक्त समर्थ रामदास स्वामी, व कल्याण, वासुदेव, उद्धव इत्यादि श्रीरामभक्ति करणारे त्यांचे शिष्य, त्याचप्रमाणें श्रीगणपति, श्रीदत्त, श्रीभवानी इत्यादि दैवतांची भक्ति करणारे पुरुष महाराष्ट्रांत विद्यमान होते. अशा या सर्व पुरुषांचा समावेश आम्ही सत्पुरुषांत करितों. याशिवाय श्रुतिस्मृतिधर्मान्वयें आचरण करणारे तपोनिष्ठ असे हि कित्येक पुरुष त्या काळीं महाराष्ट्रांत विद्यमान होते, त्यांची हि गणना सत्पुरुष या संज्ञेंत आम्ही करितों.

याप्रमाणें सत्पुरुष या संज्ञेंत कोणत्या पुरुषांचा समावेश आम्ही करितों हें दर्शविल्यावर शिवाजीसमकालीन सत्पुरुष महाराष्ट्रांत कोण कोण होते, त्यांचा व शिवाजीचा संबंध कोणत्या प्रकारें घडून आला, शिवाजी महाराजांनीं त्यांचा परामर्ष कशा रीतीनें घेतला, व परामर्ष घेण्यांत त्यांची मनोरचना कोणत्या प्रकारची होती इत्यादि मुद्यांचें अल्प दिग्दर्शन यापुढें यथानुक्रमें करीत आहे.

**( १ ) श्रीसमर्थ रामदासस्वामी :**—रामदासी सांप्रदायाचे संस्थापक हे छत्रपति शिवाजी महाराजांचे समकालीन सत्पुरुष महाराष्ट्रांत होते. पंचवटी येथें बारा वर्षे पुरश्चरण केल्यावर समर्थ बारा वर्षे तीर्थाटणास गेले ते वयाच्या छत्तिसाव्या वर्षी पंचवटीस परत आले. त्यानंतर गोदातटाक सोडून ते श्रीरामाच्या आज्ञेवरून

(**१५) सिद्धेश्वर भट बिन मेघनाथ भट ब्रह्मे**:—यांचें वास्तव्य चाकळ येथें असून अनुष्ठानी होते. शिवाजी महाराजास सिद्धेश्वरभटाच्या अनुष्ठानाचा प्रभाव जो प्रत्ययास आला त्याचा उल्लेख खालीलप्रमाणें सिद्धेश्वरभटास छत्रपतींनीं दिलेल्या सनदेंत आढळतो.

"स्वामीच्या अनुष्ठानबळें आपण राज्यास अधिकारी जालों व सकळ मनोरथ सिद्धि हें पावलों, ऐसा अनुभव आला. या शिवाय या सत्पुरुषाविषयीं "संकटकाळीं साहाय्यकारी जाणोन" असा हि उल्लेख आला आहे. शिवाजी महाराजांवर या सत्पुरुषाची जी कृपा झाली तींतून उतराई होण्यास्तव त्यांनीं आपल्या तैविषावे वर्षी पातशाही होन शंभर वर्षासन म्हणून यावत्काळपर्यंत थापलें राज्य चालेल तावत्काळपर्यंत देऊन सनद करून दिली. याशिवाय स्वर्गदेवतेच्या पूजनास श्रीनवचंडीमध्यें जपतप हवनास व ब्राह्मण-भोजनास जें लागेल तें या सत्पुरुषास या सनदेनें दिलें. या सनदेचे शेवटीं "राज्य स्वामीच्या प्रसादाचे आहे" असा उल्लेख आहे तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे. (सनदापत्रें पानें ११३, ११४)

(**१६) सिताराम वाजपेय**:—शिवाजी महाराजांनीं कर्नाटक प्रान्तावर स्वारी केली ते वेळीं चंदी प्रांतांतील इसवेली पट्ट, कुरतूड आणि मणी हीं तीन गांवें यास इनाम दिलीं.

(**१७) पुरुषोत्तम भट बिन सोमयागभट बुरखी कुंभकोणकर धर्माधिकारी**:—श्रीनिवास देवतेचे उपासक होते. श्री देवाची पूजा अबछन इत्यादि करतां चारशे वीस होनांचें वर्षासन शिवाजी महाराजांनीं या सत्पुरुषास दिलें.

(**१८) रत्नगिरी गोसावी**:—हे सत्पुरुष पर्वत पाटेश्वरी राहात होते. डोंगराचे माथ्यावर देवासन्निध मठ बांधोन राहात व देवाची उर्जा चालवीत होते. त्यास शिवाजी महाराजांनीं जमीन दिली होती. तिचे उत्पन्नांतून देवाची पूजा नैवेद्य करून अतीत अभ्यागतांचा परामर्ष घेत असत. (सनदापत्रें पान १४२)

(**१९) देव भारती गोसावी**:—या सत्पुरुषाचें वास्तव्य मुद्गलगांव येथें होतें. साल्हेर मुल्हेरचे किल्ले सर करण्याकरितां शिवाजी महाराज जात असतां थवंध्या पव्यावर त्यांची छावणी होती. तेथें त्यांना मुद्गलगांव येथें देवभारती महापुरुष गोसावी राहातात असें समजलें म्हणून महाराज त्यांच्या दर्शनास गेले. बुवा महादेवाचे मंदिरांत राहात होते. बुवांचे महाराजांनीं दर्शन घेतलें, तेव्हां "जा नववे दिवशीं साल्हेर मोल्हेर किल्ले हस्तगत होतील" असा बुवांनीं महाराजास आशीर्वाद दिला. तेव्हां किल्ले फत्ते झाले, तर मुद्गलगांव मोकासा देऊं असें महाराज बोलिले. त्यानंतर साल्हेर मोल्हेर किल्ल्यास महाराजांनीं वेढा घातला

व बुवांच्या आशीर्वादानें नववे दिवशीं किल्ला महाराजांचे हातीं आला. ( सनदापत्रें पान १४७.)

**( २० ) तान पाठक नाकीलः**-शिवाजी महाराजांनीं जालनापुरावर स्वारी केली. तेव्हां या सत्पुरुषाचे महाराजांनीं दर्शन घेतलें. तेव्हां महाराजांस स्वारींत यशप्राप्ती होईल असा आशिर्वाद तान पाठक यांनीं दिला. महाराजांची स्वारी यशस्वी झाली. तेव्हां महाराजांनीं त्यांस नागठाण गांव इनाम दिला.

**( २१ ) श्रीधर भट वापटः**-- हे पुळ्याच्या गणपती क्षेत्राचे तीर्थोपाध्ये. छत्रपति शिवाजी महाराज पुळ्याच्या श्री गणपतीचे दर्शनास गेले होते. तेव्हां श्रीची सेवा घडावी म्हणून श्रीस नित्याभिषेक पूजा व प्रदक्षणा करावयाची आज्ञा महाराजांनीं करून पातशाही होन पंचवीस रुपयांचें वर्षासन करून दिल्हे.

**( २२.) केशव भट पंडितः**-- शिवाजी महाराजांचे दानाध्यक्ष होते. या शिवाय रामायणपुराणश्रवण महाराज त्यांचेकडून करीत असत. पुराणश्रवणाचे सांगतेस्तव शिवाजी महाराजांनीं संगमेश्वर प्रांत राजापूर येथील कोंड पाच व शेते ठिकाणें तीन एकूण भूमि महसूल दाभोळी लारी १६०० चे भूमिदान यास दिले.

**( २३ ) केवळ भारतीः**— हे सत्पुरुष मौजे कॅंजळ संमत हवेली परगणे वाई येथें मठ बांधोन राहात असत. हे अनुष्ठानी बहुत थोर तपस्वी होते. शिवाजी महाराजांनीं वाईच्या कोटास वेढा घातला. ते वेळीं महाराज केवळभारती यांच्या दर्शनास गेले. तेव्हां केवळभारती यांनीं महाराजास प्रसाद दिला. व त्यास म्हणाले कीं, कोट वाईचा आपण तुम्हांस दिल्हा तुझी कार्यसिद्धि जाहलि या उपरि मी मागेन तें स्थळ मला द्यावें. शिवाजी महाराजांस ही गोष्ट मान्य झाली. त्यानंतर वाईचा कोट शिवाजीस मिळाला. तेव्हां धामणा डोंगराचे माथ्यावरील जमीन केवळभारती यांस शिवाजी महाराजांनीं इनाम दिली. ( सदनापत्रें-पान १५९-१६०.)

आतां पावेतों केलेल्या विवेचनांत शिवाजी महाराजांचे समकालीन सत्पुरुष कोण कोण होते, त्यांचा व शिवाजी महाराजांचा संबंध कोणत्या कारणामुळें घडून आला व त्यांनीं या सत्पुरुषांचा परामर्ष कोणत्या प्रकारें घेतला याचें दिग्दर्शन आम्ही केलें आहे. या विवेचनावरून एक चर्चा करण्यासारखा मुद्दा असा उपस्थित होतो कीं, या सत्पुरुषांचा परामर्ष घेण्यांत शिवाजी महाराजांच्या मनोरचनेचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें ? ज्या काळीं शिवाजी महाराज विद्यमान होते त्या काळच्या सर्व सामान्य लोकांची मनोरचना श्रद्धावान होती. त्यांच्या काळच्या सर्वसाधारण लोकांत शिवाजी महाराज अपवाद नव्हते व त्यांची मनोरचना श्रद्धावान असल्यामुळें महाराष्ट्रधर्मानें ध्येय साध्य करण्याकरितां स्वराज्यस्थापनेचें

श्रौतस्मार्त कर्मानुष्ठाते, तुमची लिला अलौकिक, वरदीपुरुष, विश्ववंद्य, जगत्पावन, अन्नदान बहुत करणारे " असें आलें आहे. चिंचवडच्या श्रीगणपती देवतेस मुसलमानी राजवटीपासून इनाम गांव चालत आले होते. मुसलमानी अमलानंतर शहाजी राजे, शिवाजी महाराज यांनीं देवस्थानाकडे पूर्वापार चालत आलेले इनाम गांव पूर्ववत् चालविण्याविषयीं सनदा दिल्या असून संस्थानास कोणीही उपसर्ग करूं नये अशा प्रकारचे हुकुम वेळोवेळीं काढलेले उपलब्ध आहेत. शिवाजी महाराजांवर श्री देवांची कृपा होती. शिवाजी महाराजांनीं त्यांची भेट घेऊन प्रश्न केला " आमचा मनोरथ श्री नारदांनीं ध्रुवास कृपा केली, तैशी सद्गुरु कृपा घडावी. आम्ही चित्तीं धरिला धर्म सिद्धीस जाऊन श्रीहरिप्राप्ती व्हावी. " याप्रमाणें प्रश्न केल्यावर रामदास स्वामींचे ठायीं निश्चय धरावा, तुम्ही चित्तीं धरिलें तसे अधिकार सर्वगुण तपे भरुन ज्ञानभक्ति योगें उपासनें करून पूर्णत्वास येऊन सिद्ध दशा प्राप्त झाली आहे, आम्हा सर्वांस मान्य, वंद्य आहेत. तुमचे मनोरथ त्याजपासून सिद्धीस जाणार. " याप्रमाणें चिंचवडचे मोरया देव यांची भेट होऊन त्यांनीं समर्थ रामदासावर दृढ विश्वास ठेवण्यास शिवाजी महाराजास सांगितले.

**( ४ व ५ ) रंगनाथ स्वामी निगडीकर** व त्यांचे बंधु **विठ्ठलराव** असे दोघे सत्पुरुष त्या काळीं विद्यमान होते. दोघेही श्री दत्त सांप्रदायी होते. विठ्ठलराव हे विजापुरचे बादशहाचे नोकर होते. तथापि ते श्री दत्ताचे परमभक्त असून साक्षात्कारी होते. या सत्पुरुषांचा व शिवाजी महाराजांचा संबंध आल्याचा उल्लेख इतिहास साधनांत उपलब्ध नाहीं. तथापि या पुढें नमूद केलेल्या सत्पुरुषांच्या व शिवाजी महाराजांच्या भेटी कश्या घडून आल्या हें लक्षांत घेतले असता, शिवाजी महाराजांनीं यांच्या गांठी घेऊन त्यांचा आशिर्वाद मिळविला असला पाहिजे असें अनुमान करणें युक्तीस सोडून होणार नाहीं.

**( ६ ) वामनः**—या नांवाचे सत्पुरुष औरंगाबादेस विद्यमान होते. यांची व शिवाजी महाराजांची गांठ झाल्याचा उल्लेख नाहीं.

**( ७ ) निंबाजी बाबा पाहिटणी ( दहीठणी )** :—त्या काळीं हे थोर पुरुष विद्यमान होते.

**( ८ ) घोघटे बुवा** :—या तत्कालीन सत्पुरुषाची व शिवाजी महाराजांची गांठ पडल्याचा उल्लेख आढळत नाहीं.

**( ९ ) जयराम स्वामी वडगांवकर** :—हे परमसिद्ध ब्रह्मचारी कृष्ण-उपासक दत्ताचे व दांत्र सांप्रदायी सत्पुरुष होते.

**( १० ) केशवस्वामी**:—हे परमसिद्ध, कीर्तन-भक्तिज्ञानरपावक म्हणून — फार प्रसिद्ध होते. यांचे वास्तव्य भागानगरीं असे.

**( ११ ) त्रिंबक नारायणाश्रम बाबा**

**( १२ ) मौनी बुवा पारगावकर**

**( १३ ) अचलपुरी गोसावीः**—परमसिद्ध संगमेश्वरी होते.

वरील सत्पुरुषांच्या व शिवाजी महाराजांच्या भेटीगांठीविषयीं तत्कालीन अस्सल साधनांचा पुरावा उपलब्ध नसला, तथापि छत्रपति शिवाजी महाराजांच्या सप्तप्रकरणात्मक चरित्रांत ( सानेप्रत पान ८६ ) खालील उल्लेख आढळतो. " कोणें एक समयीं महाराज महाडचे मुक्कामीं कांहीं कार्याचे उद्देश गेले असता तेथें (एका) सत्पुरुषाचें कीर्तन जाले. त्यात ध्रुवाख्यान कथा जाली. तेव्हां श्रीनारदानी ध्रुवास कृपा करून उपदेश केला, त्यायोगे भगवत्साक्षात्कार होऊन या लोकीचें राज्य भोगून ध्रुवपद प्राप्त झालें. हें श्रवण करून आपणास असें प्रकारें नारदाचे सारखा सत्पुरुष याची कृपा होऊन, आपण म्लेंच्छ वधून धर्मस्थापना हा संकल्प केला, हा सिद्धीस जाऊन भगवत्कृपा होय असें घडावें, हा निजध्यास प्राप्त झाला. **सर्व सत्पुरुषांची दर्शनें घेतलीं, व त्यांचे त्यांचे निर्वाह, उत्साह, महोत्साह, अन्नदानें त्यांची गांवभूमी आदीकरून ( देऊन ) व आपले अंतःकरणी असे आचरण व प्रताप** ( व्हावा असे आणिले )". सप्तप्रकरणांतील या उल्लेखावरून शिवाजी महाराजांची व वर नमूद केलेल्या सत्पुरुषांसंबंधाविषयींची माहिती उपलब्ध नसल्याचें जरी नमूद केलें आहे तरी या सर्व सत्पुरुषांच्या त्यांनीं गाठी घेऊन त्यांचा आशीर्वाद मिळवला होता व त्यांचा परामर्ष हि घेतला होता असें विधान वरील उल्लेखाचे आधारें करण्यास प्रत्यवाय नाहीं.

आतां यापुढें उपलब्ध असलेल्या अस्सल ऐतिहासिक साधनांत शिवाजी महाराजांचा ज्या सत्पुरुषांचा संबंध असल्याचें नमूद केलेलें आढळतें, त्यांच्या व शिवाजी महाराजांच्या भेटी कोणत्या कारणास्तव घडून आल्या व त्यांचा परामर्ष शिवाजी महाराजांनीं कोणत्या प्रकारें घेतला याचें दिग्दर्शन करितों.

**( १४ ) गोपाळ भट बिन श्रीधर भट महाबळेश्वरकरः—** हे महाबळेश्वर येथें रहात असत. यांचें वर्णन " भले, थोर, अनुष्ठानी, सूर्यउपासनी, पयव्रती " असें केलेलें आढळतें. छत्रपति शिवाजी महाराजांनीं यांचे पासोन मंत्रोपदेश संपादिला व आपले अभ्योदयार्थ सूर्यप्रीत्यर्थ अनुष्ठान यांना करण्यास सांगितलें. छत्रपति शिवाजी महाराजांच्या मातोश्री जिजाबाई व त्यांचे उपाध्ये वेदमूर्ति प्रभाकर भट यांच्या विद्यमानें शिवाजी महाराजांनीं त्यांच्या वयाच्या ( नव्या जन्मतिथीप्रमाणें ) बाविसाव्या वर्षी उपदेश घेतला व सूर्य प्रीत्यर्थ अनुष्ठान करण्यास्तव गोपाळभट यांस प्रतिवर्षी पाचाडें दोन धोंगर व शिराम गला दिला. ( सनदापत्रें पान ११२ )

**( १५ ) सिद्धेश्वर भट बिन मेघनाथ भट ब्रह्मे** :—यांचें वास्तव्य चाकळ येथें असून अनुष्ठानी होते. शिवाजी महाराजास सिद्धेश्वरभटाच्या अनुष्ठानाचा प्रभाव जो प्रत्ययास आला त्याचा उल्लेख खालीलप्रमाणें सिद्धेश्वरभटास छत्रपतीनीं दिलेल्या सनदेंत आढळतो.

" स्वामीच्या अनुष्ठानवळें आपण राज्यास अधिकारी जालों व सकळ मनोरथ चिंति हें पावलों, ऐसा अनुभव आला. या शिवाय या सत्पुरुषाविषयीं " संकटकाळीं साहाकारी जाणोन " असा हि उल्लेख आला आहे. शिवाजी महाराजांवर ह्या सत्पुरुषाची जी कृपा झाली तींतून उतराई होण्यास्तव त्यांनीं आपल्या तेविसावे वर्षी पातशाही होन शंभर वर्षासन म्हणून यावत्कालपर्यंत आपलें राज्य चालेल तावत्कालपर्यंत देऊन सनद करून दिली. याशिवाय स्वर्गदेवतेच्या पूजनास श्रीनवचंडीमध्यें जपतप हवनास व ब्राह्मण-भोजनास जें लागेल तें या सत्पुरुषास या सनदेनें दिलें. या सनदेचे शेवटीं " राज्य स्वामीच्या प्रसादाचे आहे " असा उल्लेख आहे तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ( सनदापत्रें पानें ११३, ११४ )

**( १६ ) शिताराम वाजपेय** :—शिवाजी महाराजांनीं कर्नाटक प्रान्तावर स्वारी केली ते वेळीं चंदी प्रांतांतील इरवेली पट्ट, कुरतूड आणि मणी हीं तीन गांवें यास इनाम दिली.

**( १७ ) पुरुशोत्तम भट बिन सोमयागभट बुरडी कुंभकोणकर धर्माधिकारी** :—श्रीनिवास देवतेचे उपासक होते. श्री देवाची पूजा अभछत्र इत्यादि करतां चारशे वीस होनांचें वर्षासन शिवाजी महाराजांनीं या सत्पुरुषास दिलें.

**( १८ ) रत्नगिरी गोसावी** :–हे सत्पुरुष पर्वत पाटेश्वरी राहात होते. डोंगराचे माथ्यावर देवासंनिध मठ बांधोन राहात व देवाची उर्जा चालवीत होते. त्यास शिवाजी महाराजांनीं जमीन दिली होती. तिचे उत्पन्नांतून देवाची पूजा नैवेद्य करून अतीत अभ्यागतांचा परामर्ष घेत असत. ( सनदापत्रें पान १४२ )

**( १९ ) देव भारती गोसावी** :—या सत्पुरुषाचें वास्तव्य मुद्गलगांव येथें होतें. साल्हेर मुल्हेरचे किल्ले सर करण्याकरितां शिवाजी महाराज जात असतां अवंध्या पल्ल्यावर त्यांची छावणी होती. तेथें त्यांना मुद्गलगांव येथें देवभारती महापुरुष गोसावी राहातात असें समजलें म्हणून महाराज त्यांच्या दर्शनास गेले. बुवा महादेवाचे मंदिरांत राहात होते. बुवाचे महाराजांनीं दर्शन घेतलें, तेव्हां " जा नववे दिवशीं साल्हेर मोल्हेर किल्ले हस्तगत होतील " असा बुवांनीं महाराजास आशीर्वाद दिला. तेव्हां किल्ले फत्ते झाले, वर मुद्गलगांव मोफ्रग देऊं असें महाराज बोलिले. त्यानंतर साल्हेर मोल्हेर किल्ल्यास महाराजांनीं वेढा घातला

व बुवांच्या आशीर्वादानें नववे दिवशीं किल्ला महाराजांचे हातीं आला. ( सनदापत्रें पान १४७.)

( २० ) तान पाठक नाकीलः-शिवाजी महाराजांनीं जालनापुरावर स्वारी केली. तेव्हां या सत्पुरुषाचे महाराजांनीं दर्शन घेतलें. तेव्हां महाराजांस स्वारींत यशप्राप्ती होईल असा आशिर्वाद तान पाठक यांनीं दिला. महाराजांची स्वारी यशस्वी झाली. तेव्हां महाराजांनीं त्यांस नागठाण गांव इनाम दिला.

( २१ ) श्रीधर भट वापटः-- हे पुळयाच्या गणपती क्षेत्राचे तीर्थोपाध्ये. छत्रपति शिवाजी महाराज पुळयाच्या श्री गणपतीचे दर्शनास गेले होते. तेव्हां श्रीची सेवा घडावी म्हणून श्रीस नित्याभिषेक पूजा व प्रदक्षणा करावयाची आज्ञा महाराजांनीं करून पातशाही होन पंचवीस रुपयांचें वर्षासन करून दिल्हे.

( २२ ) केशव भट पंडितः-- शिवाजी महाराजांचे दानाध्यक्ष होते. या शिवाय रामायणपुराणश्रवण महाराज त्यांचेकडून करीत असत. पुराणश्रवणाचे सांगतेस्तव शिवाजी महाराजांनीं संगमेश्वर प्रांत राजापूर येथील कोंड पाच व शेते ठिकाणें तीन एकूण भूमि महसूल दाभोळी लारी १६०० चे भूमिदान यास दिलें.

( २३ ) केवळ भारतीः— हे सत्पुरुष मौजे कंजळ संमत हवेली परगणे वाई येथें मठ बांधोन राहात असत. हे अनुष्ठानी बहुत थोर तपस्वी होते. शिवाजी महाराजांनीं वाईच्या कोटास वेढा घातला. ते वेळीं महाराज केवळभारती यांच्या दर्शनास गेले. तेव्हां केवळभारती यांनीं महाराजास प्रसाद दिला. व त्यास म्हणाले कीं, कोट वाईचा आपण तुम्हांस दिल्हा तुम्ही कार्यसिद्धि जाहलि या उपरि मी मागेन तें स्थळ मला द्यावें. शिवाजी महाराजांस ही गोष्ट मान्य झाली. त्यानंतर वाईचा कोट शिवाजीस मिळाला. तेव्हां धामणा डोंगराचे माथ्यावरील जमीन केवळभारती यांस शिवाजी महाराजांनीं इनाम दिली. ( सनदापत्रें-पान १५९-१६० )

आतां पावेतों केलेल्या विवेचनांत शिवाजी महाराजांचे समकालीन सत्पुरुष कोण कोण होते, त्यांचा व शिवाजी महाराजांचा संबंध कोणत्या कारणामुळें घडून आला व त्यांनीं या सत्पुरुषांचा परामर्ष कोणत्या प्रकारें घेतला याचें दिग्दर्शन आम्ही केलें आहे. या विवेचनावरून एक चर्चा करण्यासारखा मुद्दा असा उपस्थित होतो कीं, या सत्पुरुषांचा परामर्ष घेण्यांत शिवाजी महाराजांच्या मनोरचनेचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें ? ज्या काळीं शिवाजी महाराज विद्यमान होते त्या काळच्या सर्व सामान्य लोकांची मनोरचना श्रद्धावान होती. त्यांच्या काळच्या सर्वसाधारण लोकांत शिवाजी महाराज अपवाद नव्हते व त्यांची मनोरचना श्रद्धावान असल्यामुळें महाराष्ट्रधर्माचें ध्येय साध्य करण्याकरितां स्वराज्यस्थापनेचें

जें महत् कार्य त्यांनीं हातीं घेतलें होतें तें यशस्वी होण्यास्तव त्यांच्या समकालीन सत्पुरुषांचा परामर्ष घेण्याचीं जीं कारणें नमूद केलीं आहेत त्यावरून स्वराज्यस्थापनेसारख्या अव्वल दर्जाच्या कार्यापासून तों गड, प्रांत हस्तगत करण्याच्या दुय्यम दर्जाचे कार्यापावेतों सत्पुरुषांच्या आशिर्वादानें व कृपेनें त्यांना यश प्राप्त झाल्याचें दिसून येतें. *गोपाळ भट महाबळेश्वरकर* यांस स्वतःच्या अभ्युदयार्थ सूर्यानुष्ठान करण्याकरितां शिवाजी महाराजांनीं प्रतिवर्षी वंशपरंपरा मोइन करून दिली. त्याचप्रमाणें सिद्धेश्वर भट ब्रह्मे यांनीं *केलेल्या अनुष्ठानाच्या बळें राज्यास अधिकारी झाल्याबद्दल व संकटकाळीं साहाय्यकारी* झाल्याबद्दल त्यास वंशपरंपरा इनाम दिलें. *शिवाजी महाराजांच्या पूर्ववयांत* त्यांनीं हीं इनामें या सत्पुरुषास दिलीं व त्यानंतर समर्थांची कृपा व आशीर्वाद त्यांना प्राप्त झाल्यावर त्याचा प्रभाव कशा प्रकारचा झाला हें मागें नमूद केलें च आहे.

सत्पुरुषांचे बाबत शिवाजी महाराजांची तत्कालीन प्रचलित असलेल्या सर्वसाधारण मनोरचनेस अनुरूप असलेली स्वाभाविक मनोरचना होण्यास व तदनुरूप त्यांचें आचरण होण्यास जी इतर कांहीं कारणें झालीं त्यांचें दिग्दर्शन प्रस्तुत स्थळीं करणें ओघानें च प्राप्त आहे. बाळपणीं शिवाजी महाराजास देण्यांत आलेलें शिक्षण श्रद्धावान मनोरचनेस पोषक असें होतें. या शिवाय त्यांचे बाळपणचे *व्यावहारिक गुरु व कारभारी दादोजी कोंडदेव यांनीं स्वराज्यस्थापनेचा* संकल्प शिवाजी महाराजांनीं करून त्याबाबत त्यांचा सल्ला विचारला असतां त्यांनीं सत्पुरुषांच्या आशीर्वादाबाबत व्यक्त केलेलें मत त्यांच्या स्वाभाविक मनोरचनेस पोषक असें च होतें. सप्तप्रकर्णात्मक चरित्रांतील या मुद्याविषयींचा खालील उतारा फार महत्वाचा आहे. " आपण मनांत आणलें, परंतु कर्माचा शेवट लागणें परम दुर्घट आहे. सर्व पृथ्वी यवनांनीं बहुत काल पादाक्रान्त केली. स्थळ व किले, जागे, फौज यांची पृथ्वी भरून निघाली. *या कारणास्तव आपणास मातब्बर स्थळें असावीं, हिंदु राजे व फौजा जागांजागां* आपलें साहाय्य करीत असावें, आपण हि परम दुष्कर कर्म, श्रम साहास जीवाहून अधिक करावे; **त्यास ईश्वराची अनुकूलता च सिद्धपुरुषांचा आशीर्वाद घडावा तेव्हां अशा गोष्टी अवलंबाव्या** " (स. च. खरे पा. ६१). याप्रमाणें दादोजी कोंडदेव यांनी व्यक्त केलेल्या मतांतील शिवाजी महाराजांनीं मसलत करण्याचे गुण घेतले व त्यांना आपपर्यंत असलेल्या बाबींकडे दुर्लक्ष केलें. दादोजी कोंडदेवांच्या या सल्ल्यानुसार ईश्वराची अनुकूलता व सत्पुरुषांची कृपा व आशिर्वाद शिवाजी महाराजांनीं मागें नमूद केल्याप्रमाणें संपादन केले.

शिवाजी महाराजांचे गुरु समर्थ रामदास स्वामींच्या अनेक सर्वप्रसिद्ध

'म ' स्थीत खालील शक्ति साइटने.

सामर्थ्य आहे चळवळेचें । जो जो करील तयाचें ।
परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ २०-४-२६

या वचनांतील भगवंताचें अधिष्टान याचा अर्थ भगवत्‌भक्ति करणाऱ्या सत्पुरुषांची कृपा व हातीं घेतलेल्या कार्यांत यश प्राप्त होण्यास्तव त्यांचा आशीर्वाद व कृपासंपादन करणें, असा करणें युक्तीस सोडून होणार नाहीं. या समर्थांच्या वचनप्रमाणें शिवाजी महाराजांनीं सत्पुरुषांचा आशिर्वाद मिळविणें युक्त च होतें.

आतां दर्शविलेल्या या कारणाशिवाय शिवाजी महाराजांची वरील मनोरचना बनून त्यांच्या समकालीन सत्पुरुषांचा परामर्ष घेण्यास ते दुसऱ्याही एका कारणामुळें उद्युक्त झाले असावे. भारतीय राजनीतींत राजाचीं कर्तव्यें दिलेलीं आढळतात. त्यांत सत्पुरुषांचा परामर्ष घेणें हें एक महत्वाचें कर्तव्य सांगितलें आहे. शुक्रनीतींत या विषयींचें खालील वचन आढळतें.

पट्कमेतन्नियोक्तव्यं ग्रामे ग्रामे पुरे पुरे । १२२
तपस्विनो दानशिलाश्श्रुतिस्मृति विशारदाः ॥
पौराणिका शास्त्रविदो दैवज्ञा मांत्रिकाश्च ये । १२३
आयुर्वेदविदः कर्मकाण्डज्ञास्तांत्रिकाश्च ये ।
ये चान्ये गुणिनश्नीद्या बुद्धिमन्तो जितेन्द्रियाः ॥ १२४
तान् सर्वांनां पोपयेद्भृत्या दानैर्मानैस्सुपूजितान् ।
(शुक्रनीति अध्याय २)

अर्थः--गांवांतून त्याचप्रमाणें शहरांतून राहाणारे पट्कर्मनिरत, तपश्चर्या करणारे, दानशील, श्रुतिस्मृतिपारंगत, पुराणशास्त्रपारंगत, ज्योतिर्विद, मांत्रिक, आयुर्वेदविशारद, कर्म व ज्ञान मार्गाचें आचरण करणारे, तंत्रविद्यानिपुण, गुणी, बुद्धिमान व जितेंद्रिय अशा पुरुषांना राजानें योग्य दानें देऊन त्यांचें पोषण करावें.

शिवाजी महाराजांस भारतीय राजनीतीचीं तत्त्वें लहानपणीं च शिकविण्यांत आलीं होतीं. या शिवाय त्यांच्या सान्निध्यांत सोनोपंत डबीरासारखे राजनीतिनिपुण जे अनेक मुत्सद्दी होते, त्यांच्या निकट सहवासाचा व शिकवणीचा परिणाम त्यांच्यावर होऊन सत्पुरुषपरामर्षाकडे त्यांचें मन वळलें असावें. या सर्व कारणांचे योगानें शिवाजी महाराज त्यांच्या समकालीन सत्पुरुषांचा आशिर्वाद व कृपा, त्यांनीं हातीं घेतलेलें स्वराज्य स्थापनेचें महत्‌कार्य यशस्वी करण्यास्तव, संपादन करण्यास उद्युक्त झाले व या सत्पुरुषांनीं त्यांच्यावर केलेल्या उपकारांविषयीं कृतज्ञता व्यक्त करण्यास्तव त्यांनीं त्यांचा परामर्ष घेतला व योगक्षेम चालविला असें सिद्धांतवत् विधान नमूद करून हा लेख आम्ही समाप्त करतों.

( १२ )

॥ श्रीसद्गुरु प्रसन्न ॥

# पीतापासून कृष्ण जालें

( लेखक — रा. महादेव काशीनाथ सेर, इंदूर )

पंधराव्या दशकांत दोन कूटें आहेत. एक ' दोघा ऐसीं तीन चालती ' व दुसरें ' पीतापासून कृष्ण जालें '. पैकीं दुसऱ्या कूटांतील नऊ ओव्यांचें स्पष्टीकरण प्रस्तुत दिलें जात आहे. तज्ज्ञ दासभक्तांची संमति मिळाल्यास उत्तम च. किंवा यांतील विसंगति कोणी निदर्शनास आणून दिल्यास लेखक त्यांचा ऋणी होईल; व जमल्यास, दुराग्रह न करितां ती दूर करण्याचा प्रयत्न करील. या दशकांत

मुळापासून सेवटवेरा । अवघा पंचीकर्ण पसारा ।
त्यांत साक्षत्वाचा दोरा । तो हि तत्वरूप ॥ १५-३-१

असें सांगून श्री आत्मारामग्रंथांत सांगितलेली एक च माया दोन ठिकाणीं कशी वाटली गेली व प्रकृतिपुरुषें नंतर कशीं झालीं याची आणीव श्रीसमर्थांनीं पाचव्यांस करून दिली. तात्पर्य मूळापासून तों शेवटपर्यंतचा अर्थात् पिंडापर्यंतचा विस्तार निरनिराळ्या स्थळीं श्रीसमर्थांनीं या दशकांत दाखविला आहे. प्रस्तुतच्या कूटांत विशेषतः विस्ताराचा क्रम सोपपत्तिक पण सूत्ररूपानें दाखवून त्याचें पर्यवसान परमार्थशास्त्रांत चातुर्यानें कसें होतें तें पूर्णपणें दाखविलें आहे.

## पीतापासून कृष्ण जालें

पीत या शब्दानें श्रीसमर्थांनीं ब्रह्माचा च निर्देश केला आहे. अर्थात् तो साक्षेपत्वानें च केला आहे हें स्पष्ट आहे. जीव आपल्या सोयीकरितां जसें आकाशाचे दिशारूपानें चार भाग आपल्या कल्पनेनें च पाडित असतो, तद्वत् हा जीवही आपल्या सोईकरितां ब्रह्माग पीतवर्ण असें कल्पनेनें च ठरवीत असतो. कारण इतकें च की, कल्पित चार देहांपैकीं स्थूलदेहाचा रक्तवर्ण, लिंगदेहाचा श्वेतवर्ण, कारणाचा ( अज्ञानाचा ) श्यामवर्ण व महाकारण देहाचा नीलवर्ण असें आत्मपरीक्षणग्रंथांत म्हटलें जातें; म्हणून च सापेक्षत्वानें ब्रह्माचा पीतवर्ण असा

संकेत केला जातो; वस्तुतः ब्रह्म सर्ववर्ण असून हि वर्णरहित च म्हटलें जातें. व्यवहाराच्या सोईकरितां जरी आकाशाचे विभाग कल्पनेनें पाडिले तरी तें स्वतः अभेद्य च असतें, तद्वत् चार देहांच्या वर्णव्यवस्थेमुळें जरी ब्रह्माची पीतवर्ण व्याप्ति आपल्या सोईकरितां जीवानें कल्पिली तरी ब्रह्म निरंतर वर्णरहित च असतें. म्हणून च श्रीसमर्थ सातव्या दशकांत

> कल्पूं जातां वाटे काळें । ब्रह्म काळें ना पिवळें ।
> आरक्त निळें ना धवळें । वर्णरहित ॥ ७–७–५

असें म्हणतात.

दुसरें कारण असें कीं ब्रह्म ज्योतिर्मय प्रतिपादिलें जातें व ज्योतीचा रंग पिवळा असतो म्हणून च श्रीमत्भगवत्गीतेंत यास ' आदित्यवर्ण तमसः परस्तात् ' असें म्हटलें आहे. अंगिरा ऋषींनीं भवकथाशास्त्रांत नरचक्रांचें वर्णन करीत असतांना ' पीतवर्णं कोटिसूर्यप्रकाशातेजसम् ' असें च निरूपित केलें आहे. जनार्दन स्वामी म्हणतात कीं,

> झाळियेचा अभ्र अणु । तैसा दिसे निरंजनु ।
> पीतप्रभा असे तेथें । त्यांत पहा रघुनाथ ।

संत तुकाराम म्हणतातः—

> उन्मनीची मुद्रा चेपूनियां दिली । चहूंकडे झाली प्रभा सारी ॥
> रक्त श्वेत श्याम नील पीतवर्ण । नानापरी जाण रंग त्याचे ॥

याप्रमाणें संतांची ब्रह्माच्या पीतवर्णाबद्दलची एकवाक्यता जीवाच्या सोईकरितां च आहे, वस्तुतः नाहीं; म्हणून श्रीसमर्थ ब्रह्मास पीत असें सापेक्षत्वानें च म्हणत आहेत.

आतां अशा निरंजन ब्रह्मापासून कृष्ण कसें झालें असा साहजिक च प्रश्न उद्भवतो. पण असा प्रश्न करितांना आपण एक गोष्ट विसरतों ती ही कीं, जेव्हां आपण निर्गुण ब्रह्माला पाहण्याचा अथवा शोधण्याचा प्रयत्न करीत असतो तेव्हां त्याच्या मुळाशीं आपला कांहीं हेतु असतोच. अर्थात् द्वैत भावनेनें आपण त्याच्याकडे पाहात असतों हें विसरतां कामा नये. तें द्वैत म्हणजे जीवाची देहात्मबुद्धि होय. हिचें विवरण करितां करितां आपली वृत्ति माघारी न्यावी म्हणजे ऊर्ध्वदृष्टीनें भेद नाहींसा होत जातो. स्थूलांतून सूक्ष्माकडे व सूक्ष्मांतून त्याच्याहि पलीकडे म्हणजे महाकारण देहापर्यंत दृष्टि नेली कीं, उपासनेचा अंत होतो. हा महाकारण देह नीलवर्णाचा आहे असें वर प्रतिपादन केलें च आहे. तो च माया किंवा शुद्ध ज्ञान. महाकारण देह च जर माया तर तिचा रंग कृष्ण

॥ श्रीसद्गुरु प्रसन्न ॥

# पीतापासून कृष्ण जालें

( लेखक — रा. महादेव काशीनाथ खेर, इंदूर )

पंधराव्या दशकांत दोन कूटें आहेत. एक ' दोघा ऐसीं तीन चालती ' व दुसरें ' पीतापासून कृष्ण जालें '. पैकीं दुसऱ्या कूटांतील नऊ ओव्यांचें स्पष्टीकरण प्रस्तुत दिलें जात आहे. तज्ज्ञ दासभक्तांची संमति मिळाल्यास उत्तम च. किंवा यांतील विसंगति कोणी निदर्शनास आणून दिल्यास लेखक त्यांचा ऋणी होईल; व जमल्यास, दुराग्रह न करितां ती दूर करण्याचा प्रयत्न करील. या दशकांत

मुळ्यापासून सैरावैरा । अवघा पंचीकर्ण पसारा ।
त्यांत साक्षत्वाचा दोरा । तो हि तत्वरूप ॥ १५-३-१

असें सांगून श्री आत्मारामग्रंथांत सांगितलेली एक च माया दोन ठिकाणीं कशी वाटली गेली व प्रकृतिपुरुषें नंतर कशीं झालीं याची जाणीव श्रीसमर्थांनीं वाचकांस करून दिली. तात्पर्य मूळापासून तों शेवटपर्यंतचा अर्थात् पिंडापर्यंतचा विस्तार निरनिराळ्या स्थानीं श्रीसमर्थांनीं या दशकांत दाखविला आहे. प्रस्तुतच्या कूटांत विशेषतः विस्ताराचा क्रम सोपपत्तिक पण सूत्ररूपानें दाखवून त्याचें पर्यवसान परमार्थप्राप्तींत चातुर्यानें कसें होतें तें पूर्णपणें दाखविलें आहे.

## पीतापासून कृष्ण जालें

पीत या शब्दानें श्रीसमर्थांनीं ब्रह्माचा च निर्देश केला आहे. अर्थात् तो सापेक्षत्वानें च केला आहे हें स्पष्ट आहे. जीव आपल्या सोयीकरितां जसे आकाशाचे दिशारूपानें चार भाग आपल्या कल्पनेनें च पाडित असतो, तद्वत् हा जीवही आपल्या सोईकरितां ब्रह्मास पीतवर्ण असें कल्पनेनें च ठरवीत असतो. कारण इतकें च कीं, कल्पित चार देहांपैकीं स्थूलदेहाचा रक्तवर्ण, लिंगदेहाचा श्वेतवर्ण, कारणाचा ( अज्ञानाचा ) श्यामवर्ण व महाकारण देहाचा नीलवर्ण असें शास्त्रपरिपाठीप्रमाणें म्हटलें जातें; म्हणून च सापेक्षत्वानें ब्रह्माचा पीतवर्ण असा

मूळ माया द्वैताची जननी असल्यामुळें भेद नेहेमीं अधोमुखी च असावयाचा व खालीं वाटत च असावयाचा म्हणून श्रीसमर्थ म्हणतात—

ज्ञानें येवढें ब्रह्मांड केलें । ज्ञानें येवढें वाढविलें ।
नाना विकाराचें वळलें । तें हें ज्ञान ॥ २०-१-२९

माया ही केवळ नाना विकारांची मूळ च असल्यामुळें तिची गति अधोमुख सदैव असते; म्हणून ती भूमंडळावर विस्तारते.

येथपर्यंत कृष्णाची म्हणजे मायेची उत्पत्ति दाखविली. आतां तिचें स्वरूप दाखवीत आहेत. श्रीसमर्थ म्हणतात--

माया ब्रह्मीं जो समीर । त्यांत जाणता तो ईश्वर । १०-४-१६

म्हणून च ईश्वराच्या संगाला माया असें म्हणतात--

तेथें दोनी भेद दिसती । विवेकें पहावी प्रचीती ।
निश्चळीं जे चंचल स्थिति । तो चि वायो ॥
तयामध्यें जाणीव कळा । जगज्जोतीचा जिव्हाळा ।
वायो जाणीव मिळोन मेळा । मूळमाया बोलिजे ॥
वायोमध्यें जाणीव विशेष । तो चि प्रकृतीमध्यें पुरुष ॥

हें मायेचें ( कृष्णाचें ) स्वरूप. या मायेला ब्रह्माचें अधिष्ठान असल्यामुळें त्याचें संसरण जाणीवरूपानें मायेमध्यें झालें त्यास पुरुष अशी संज्ञा दिली. माया स्वतः जड म्हणून तिचा विस्तार, जर मायेंत जाणीव नसती तर, समजला नसता म्हणून च तेणेंवीण उमजलें हें तो घडेना असें श्रीसमर्थ म्हणतात. या ठिकाणीं श्रीसमर्थांनीं पुरुषाचें साहचर्य तर दाखविलें पण त्याबरोबर च मायेचें चंचलत्व दाखवून तिचें वायुस्वरूप हि निदर्शनास आणिलें व मग तिला प्रकृति अशी निराळी संज्ञा दिली. एकरूपत्वानें प्रकृतिपुरुषांच्या मिश्रणास माया असें स्पष्ट करून तिचें यथार्थ स्वरूप वाचकांच्या निदर्शनास आणून दिलें या प्रमाणें प्रथम मायेची ब्रह्मापासून उत्पत्ति, बरोबर च पुरुषरूपानें ( जाणीवरूपानें ) तिच्यांत ब्रह्माचें संसरण व त्यानंतर प्रकृतिपुरुषरूपानें तिचें अव्यभिचारी स्वरूप वरील ओवींत श्रीसमर्थांनीं वाचकांच्या लक्षांत आणून दिलें.

आहे तरी स्वल्प लक्षण । सर्वत्रांची सांठवण ।
अधम आणी उत्तम गुण । तेथें चि वसती ॥ २ ॥ १५-६-२

वर जें मायेचें स्वरूप सांगितलें अर्थात् निश्चळावर जें चंचलत्व अथवा ब्रह्मावर मूळसंकल्पाचा आरोप, हें लक्षण तर स्वल्प दिसतें तरी मूर्ति छोटी पण

कां नसावा वरें ? शिवाय माया म्हणजे शुद्ध ज्ञान. याचें च महावाक्याच्या बोधामुळें विज्ञान होतें; अर्थात् 'अहं ब्रह्मास्मि' या स्फूर्तीतील सूक्ष्म भेदाचा निरास होतो व मग जीव ब्रह्माशीं अनन्य होतो. यास च विज्ञान असें म्हणतात. आतां जें ज्यापासून निर्माण होतें त्यांत च तें लय पावतें असा नियम आहे. या नियमाला अनुसरून च जर ज्ञान म्हणजे माया ही जर विज्ञानांत म्हणजे ब्रह्मांत लय पावते तर ती ब्रह्मापासून च उत्पन्न झाली असें ओघानें च सिद्ध होतें; म्हणून च ब्रह्म पीतवर्णाचें असा अंगीकार करून च श्रीसमर्थ पीतापासून कृष्ण ( माया ) झालें असें म्हणतात.

वरील विवेचनावरून माया ही द्वैताची जननी झाली म्हणून च श्रीसमर्थ म्हणतात कीं,

> निश्चळामधें चंचळ । ते चि कल्पना केवळ ।
> अष्टधा प्रकृतीचें मूळ । कल्पनारूप ॥ ११-१-५

एवढ्या च करितां कल्पना सोडून दिल्याशिवाय जीव ब्रह्मनिष्ठ होऊं शकत नाहीं. ही आपली कल्पना च, ब्रह्म जसेंच्या तसें च असतांना सुद्धां त्याच्यावर आरोप करते.

> नाना सूक्ष्मरूप । सूक्ष्म आणी कर्दमरूप ।
> मुळींच्या संकल्पाचा आरोप । मूळमाया ॥ २०-५-५

येथें एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं ज्या वस्तूवर आरोप केला जातो ती वस्तु जशीच्या तशी च स्वरूपतः असते; त्याप्रमाणें च कल्पनेनें, संकल्पाचा अथवा गुणाचा आरोप जरी आपण ब्रह्मावर केला तरी ब्रह्म जसेंच्या तसें च निर्विकारी असतें; उलट आरोप करणारा जीव च कृष्णत्व पावतो. व्यवहारांतसुद्धां रुपया पांढरा शुभ्र असतांना हि रखानजीचे हात मात्र काळे होतात; तद्वत् ब्रह्म निर्मल निर्विकार राहून हि कल्पकास मात्र काळेपणाचा डाग लागतो ही च परमेश्वराची विचित्र लिला होय. कल्पनेचें कार्य तें एवढें च, म्हणून च पीतापासून कृष्ण झालें असें श्रीसमर्थ म्हणतात.

माया कर्दमरूप असल्याचें वर सांगितलें गेलें आहे. कर्दम कृष्णवर्णाचा असतो हें सर्वांस विदित आहे च, म्हणून च तिला कृष्ण अशी संज्ञा श्रीसमर्थांनीं दिली.

व्यवहारांत दिव्याची ज्योत पीतवर्णाची असते पण तिच्यापासून काजळी उत्पन्न होते हें आपण पहातों च. तद्वत् ही कल्पनारूपी काजळी ब्रह्मदीपकापासून निर्माण झाली आहे. व्यवहाराला तरी ब्रह्माशिवाय दुसरें अधिष्ठान कोठें मिळणार ?

> अखंडचि विस्तारलें । तेणेंविण उमजलें । हें तो घडेना ॥ १ ॥ १५-६-१

सकळांस जें मान्य । तें चि होतसे सामान्य ।
सामान्यास अनन्य । होइजेत नाहीं ॥ ६ ॥ १५-६-६

संसारी व चतुर म्हणजे परमार्थी या दोहोंमधील भेद श्रीसमर्थ दाखवीत आहेत. जो संसारी असतो तो सर्व लोकांस जें मान्य असतें त्याला च तो अनन्य होण्याचा प्रयत्न करीत असतो पण चतुर जो असतो त्याचें लक्ष अनुभवाकडे असतें. *संसारांतील सर्व ज्ञानांचा अनुभव एकसारखा नसतो असें तो जाणत असतो* म्हणून तो संसारांतील सामान्यास अनन्य होत नाहीं हें च पुढील ओंवीच्या उदाहरणावरून श्रीसमर्थ पटवीत आहेत.

उत्तम मध्यम कनिष्ठ रेखा । अदृष्टीची गुप्त रेखा ।
चत्वार अनुभव सारिखा । होत नाहीं ॥ ७ ॥ १५-६-७

अनुभव एकसारखा कसा नसतो तें रेषासामान्यावरून श्रीसमर्थ वाचकांस पटवीत आहेत. शरीर हें लहान थोर तत्वांचें बनलेलें आहे हें सर्वांस मान्य आहे च. या तत्वांपैकीं मुख्य तत्व शुद्ध सत्व अथवा मूलमाया हें होय. साधकास याच तत्वाची विवंचना करावी लागते म्हणजे याचें ज्ञान प्राप्त करून घ्यावें लागतें. हें तत्व-ज्ञान तर शब्दांच्या अर्थभेदापासून उत्पन्न झालेलें असतें व शब्द तर रेषेचें गुंडाळें करून जीं मातृकाक्षरें होतात त्यापासून उत्पन्न झालेले असतात. हे शब्द च या स्थूळ देहाची वैखरी वाचा. म्हणून रेषेचें महत्व विशेष होय. शिवाय या तत्वांच्या बनलेल्या शरीरांतून जर अष्टधा प्रकृतीचे वारें निघून गेलें तर मग काय उरतें ? शाश्वत ब्रह्म कीं नाहीं ? एवढ्या च करितां बाराव्या दशकांत रेषेचें गुंडाळें केलें हा समास विवेक वैराग्यांत समाविष्ट करावा लागला. असो. ही गोष्ट देहाची झाली. पण पिंडाचे चार देह आहेत व प्रत्येक देहाला वाचा हि आहे च.

ध्वनि घोष नाद रेखा । चहूं वाचामध्यें देखा ।
वाचारूपें हीं ऐका । नाना भेद ॥ १२-५-७

उन्मेष परा ध्वनि पश्यंती । नाद मध्यमा शब्द चौथी ।
वैखरीपासून उमटती । नाना शब्दरत्नें ॥ ८

' वैखरी वाणीची निसर्गसिद्धि ज्या प्राण्यांना नसते त्यांचे व्यवहार मध्यमा वाणीनें च होत असतात. मध्यमा ही मनाची वाणी होय व मन म्हणजे च सूक्ष्म अथवा लिंगदेह होय. वैखरी वाणी ही कर्मेंद्रियांत गणली जाते म्हणून च तिला कनिष्ठ रेखा असें मूळ ओंवींत म्हटलें. कर्मेंद्रियांचा लय मनात होतो म्हणून च रेखारूप वैखरी वाणी मध्यमेमध्यें सूक्ष्मरूपानें राहते. स्थूल देहांत स्वप्नसमयीं सर्व व्यवहार या मध्यमावाणीनें च विशेषतः होत असतात; व देहत्याग झाल्यावर

वर सांगितलें च आहे कीं, प्रकृतिपुरुष मिळोन संसृतीचा कार्यभाग चालतो. हा कार्यभाग दोन प्रकारचा असतो; एक ब्रह्मांड व दुसरें पिंड. पैकीं त्रिगुणात्मक पंचभूतांच्या ब्रह्मांडांत जाणीव थोडी असते व माया त्यांत कारणरूपानें असते. परंतु पिंड हें मायेचें कार्य असल्यामुळें त्यांत जाणिवेची दाटणी अधिक असते.

च्यारी खाणी अनंत प्राणी । जाणिवेची जाली दाटणी । २०-५-१३

ती हि कार्यरूपानें च. गुणांचीं रूपें जाणीव नेणीव व विपरीत ज्ञान असें नवव्या व विसाव्या दशकांत सांगितलें च आहे. पैकीं केवळ जाणीव व केवळ नेणीव हीं इहलोकाच्या सार्थकतेस उपयोगाचीं नाहींत असें वर निर्दिष्ट केलें च आहे. आतां राहिलें विपरीत ज्ञान म्हणजे एकाचें एक दिसणें. तो रजोगुणाचा स्वभाव. हा मूळांत च दृष्टिगोचर होतो. निर्गुण ब्रह्मासारखें भासलें व कल्पना केल्यावर अनुमानलें म्हणून या भासाला च माया असें म्हटलें च मायेस कृष्णत्व प्राप्त झालें तें तिच्यांतील रजोगुणामुळें. हा रजोगुण पिंडाचा उत्पादक म्हणून जीवाचें विपरीत ज्ञान हा त्याचा स्वभावधर्म झाला व मग जीवास या सृष्टीची सत्यता भासूं लागली व त्याच्या दृढाशीं असलेलें सत्य ब्रह्म दिसेनासें झालें. म्हणून च रजोगुणास कृष्ण असें मूळ ओवींत म्हटलें. कारण तो ज्ञानाज्ञानांत मिश्रित झाला कीं, ब्रह्मास लोपून टाकून सृष्टीची मात्र सार्थकता म्हणजे वृद्धि करतो. ही जाणीव वारांना जीवास येरझारा करण्यास कशी लावते व इहलोकाची सार्थकता कशी करते तें नवव्या दशकांत दाखविलें गेलें आहे. तात्पर्य इतकें च कीं, मूळचें च कृष्ण ( माया ) आपल्या कार्यांत म्हणजे पिंडांत विपरीत ज्ञान रूपानें परिणत होऊन च इहलोकाची सार्थकता करीत असतें.

विवरतां याचा विचार । मूर्ख तो चि होये चतुर ।
सद्यःप्रचित साक्षात्कार । परलोकींचा ॥ ५ ॥ १५-६-५

इहलोकसार्थकता संसारी मनुष्यास म्हणजे मूर्खास च आवडते. परंतु

जो विवरोन समजला । तेथें संदेह नाहीं उरला ।

म्हणून च तो परलोकाच्या साक्षात्काराला पात्र होतो. शिवाय

सकळ सृष्टीचें बीज । मूळमायेंत असे सहज ।
अवघें समजतां सज्ज । परमार्थ होतो ॥ २०–२–१७

असें हें त्यागरूप रहस्य ज्या चतुर पुरुषाच्या मनास पटेल त्यास च ईश्वरी साक्षात्कार होईल असें गूढ श्रीसमर्थ पटवीत आहेत; कारण हा समास चातुर्य विवरणाचा आहे हें आपण विसरतां कामा नये.

सकळांस जें मान्य । तें चि होतसे सामान्य ।
सामान्यास अनन्य । होइजेत नाहीं ॥ ६ ॥ १५–६–६

संसारी व चतुर म्हणजे परमार्थी या दोहोंमधील भेद श्रीसमर्थ दाखवीत आहेत. जो संसारी असतो तो सर्व लोकांस जें मान्य असतें त्याला च तो अनन्य होण्याचा प्रयत्न करीत असतो पण चतुर जो असतो त्याचें लक्ष अनुभवाकडे असतें. संसारांतील सर्व ज्ञानांचा अनुभव एकसारखा नसतो असें तो जाणत असतो म्हणून तो संसारांतील सामान्यास अनन्य होत नाहीं हें च पुढील ओवीच्या उदाहरणावरून श्रीसमर्थ पटवीत आहेत.

उत्तम मध्यम कनिष्ठ रेखा । अदृष्टींची गुप्त रेखा ।
चत्वार अनुभव सारिखा । होत नाहीं ॥ ७ ॥ १५–६–७

अनुभव एकसारखा कसा नसतो तें रेषासामान्यावरून श्रीसमर्थ वाचकांस पटवीत आहेत. शरीर हें लहान थोर तत्वांचें बनलेलें आहे हें सर्वांस मान्य आहे च. या तत्वांपैकीं मुख्य तत्व शुद्ध सत्व अथवा मूलमाया हें होय. साधकास याच तत्वाची विवंचना करावी लागते म्हणजे याचें ज्ञान प्राप्त करून घ्यावें लागतें. हें तत्व-ज्ञान तर शब्दांच्या अर्थभेदापासून उत्पन्न झालेलें असतें व शब्द तर रेखेचें गुंडाळें करून जीं मातृकाक्षरें होतात त्यापासून उत्पन्न झालेले असतात. हे शब्द च या स्थूळ देहाची वैखरी वाचा. म्हणून रेखेचें महत्व विशेष होय. शिवाय या तत्वांच्या बनलेल्या शरीरांतून जर अष्टधा प्रकृतींचें धारें निघून गेलें तर मग काय उरतें ? शाश्वत ब्रह्म कीं नाहीं ? एवढ्या च करितां बाराव्या दशकांत रेखेचें गुंडाळें केलें हा समास विवेक वैराग्यांत समाविष्ट करावा लागला. असो. ही गोष्ट देहाची झाली. पण पिंडाचे चार देह आहेत व प्रत्येक देहाला वाचा हि आहे च.

ध्वनि घोष नाद रेखा । चहूं वाचामध्यें देखा ।
वाचारूपें ही ऐका । नाना भेद ॥ १२–५–७

उन्मेष परा ध्वनि पश्यंती । नाद मध्यमा शब्द चौथी ।
वैखरीपासून उमटती । नाना शब्दरत्नें ॥ ८

' वैखरी वाणीची निसर्गसिद्धि ज्या प्राण्यांना नसते त्यांचे व्यवहार मध्यमा वाणीनें च होत असतात. मध्यमा ही मनाची वाणी होय व मन म्हणजे च सूक्ष्म अथवा लिंगदेह होय. वैखरी वाणी ही कर्मेंद्रियांत गणली जाते म्हणून च तिला कनिष्ठ रेखा असें मूळ ओवींत म्हटलें. कर्मेंद्रियांचा लय मनांत होतो म्हणून च रेखारूप वैखरी वाणी मध्यमेमध्यें सूक्ष्मरूपानें राहते. स्थूल देहांत स्वप्नसमयीं सर्व व्यवहार या मध्यमावाणीनें च विशेषतः होत असतात; व देहत्याग झाल्यावर

पुनः दुसऱ्या शरीराची प्राप्ति होईपर्यंत लिंगदेहाचे सर्व व्यवहार मध्यमा वाणीनें च होत असतात. म्हणून च या दोन्ही वाणींचा अनुभव सारखा नसतो. व्यवहारांत सुद्धां जागृति व स्वप्न यांचे अनुभव एकसारखे नसतात. मूळ ओवींत सांगितलेली मध्यम रेखा ती या वाणीची अथवा लिंगदेहाची होय; कारण संकेत अथवा चिह्न हें रेषेचें पूर्वरूप होय. आतां या स्थूल देहांत मध्यमा वाणीचें अर्थात् बुद्धीच्या संगानें झालेल्या नादाचें कंठस्थान आहे म्हणून नादभेदामुळें रागज्ञानाची ( संगीताची ) उत्पत्ति झाली; व नादब्रह्म झालें.

वैखरी कर्मेंद्रिय, मध्यमा ज्ञानेंद्रिय, तर पश्यंती ही विवेकलक्षणा होय. मौन्य तर बिघडत नाहीं, पण कार्य तर चालू असतें. या स्थूलदेहांत ही सुषुप्तिकाळीं असते म्हणून च ' सुखानें निजलों होतों ' असा अनुभव जागृतींत सांगतां येतो. ही मनाच्या आकाराची असून ध्वनिरूपानें स्फुरते म्हणून च अनहतध्वनि बुद्धीनें जाणला जातो. दोन्ही वाचांचा ठसा हिच्यांत उतरतो म्हणून हिला उत्तम रेखा असें मूळ ओवींत म्हटलें; कारण दुःखाचा विसर पडून विश्रांति हि प्राप्त होते.

जीवात्मयाचें जें प्रथम स्फुरण ती च परा जाणीवरूप मूळमाया, अथवा शुद्धसत्व होय. ही साक्षिस्वरूपाची असल्यामुळें हिला अदृष्टीची गुप्त रेखा असें मूळांत म्हटलें. कारण चौथ्या देहाची ही वाचा होय. मूळमाया हा चौथा देह तो च बीजभाव, म्हणजे अव्यक्त अर्थात् अदृष्ट म्हणून ही गुप्तरेखा. या च मुख्य तत्वांचें ज्ञान शब्दांच्या अर्थभेदामुळें होतें म्हणून रेखाचें महत्व. प्रत्येक वाणींत या चारी म्हणजे घोष, ध्वनि, नाद व रेखा या कशा आहेत हें सूत्ररूपानें वर सांगितलें च आहे. मात्र प्रत्येकीचा अनुभव एक सारिखा नसतो हें आतां सर्वांच्या लक्षांत आलें च आहे.

देह व त्याची वाचा यांचें साहचर्य असावयाचें च. तथापि केवळ वाणीचा च विचार करावयाचा असेल तर ओंकाराचें बीज जें प्रणव तें अदृष्टीची गुप्त रेखा. या प्रणवापासून औटमात्रांच्या ओंकाराची अभिव्यक्ति ही उत्तम रेखा. ती व्यक्त दशेला अनहतध्वनिरूपानें आली. नंतर हा च ध्वनि बुद्धीच्या संगानें नादरूप झाला म्हणून ती मध्यम रेखा. पुढें हा नाद च मुखांतून अभिव्यक्त शब्दरूपानें झाला ती वैखरी म्हणजे कनिष्ठ रेखा. ज्याप्रमाणें आकाशांत अग्नीचें रूप उष्णारूपानें व्यापक व अव्यक्त ( अदृष्ट ) दशेंत असतें, पण अरणीमध्यें मन्थन केल्यावर तो च सूक्ष्मरूपानें प्रगट होतो व वायूचें साहाय्य मिळाल्यावर ज्वालारूप होऊन मध्यम दशेला प्राप्त होतो व हवनद्रव्याची आहुति मिळाल्यावर अमर्याद वाढतो; त्याच प्रमाणें सूक्ष्म घोष ( नाद ) शिवाच्या संयोगामुळें ध्वनिरूप होऊन जीवाच्या अर्थात् प्राणाच्या संयोगानें नादरूप होऊन वर् वर्णांच्या प्रयोगानें तो च वैखरी रूपानें अभिव्यक्त होतो. म्हणून च श्रीसमर्थ प्रत्येक वाणींत ही चार आहेत अर्थें

सांगतात. ही कशी आहेत हें लक्षांत यावें म्हणून सूत्ररूपानें वरील स्पष्टीकरण केलें गेलें आहे. असो. या चारींचा अनुभव सारिखा नसतो म्हणून चतुर परमार्थी या रेखासामान्यास अनन्य होत नाहीं; तो केवळ प्रत्ययास च अनन्य असतो.

चौदा पिंड्याचे पवाडे । सांगती ते शाहाणे कीं वेडे ।
ऐकत्याने घडे कीं न घडे । ऐसें पहावें ॥ ८ ॥ १५-६-८

श्रीसमर्थांची भिस्त प्रत्ययावर च आहे. आधीं केलें मग सांगितलें हा त्यांचा बाणा च आहे. मायेचे चौदा संकेत विसाव्या दशकांत समास ३ मध्यें सांगितले आहेत. पायरीपायरीनें ते एकापासून एक अशा पायरीनें अभिव्यक्त झालेले आहेत. त्यांचें विवरण येथें देऊन लेख अधिक वाढविणें इष्ट नव्हे. वाचकांस ग्रंथराज उपलब्ध आहे च. शेंड्याकडील टांक अथवा शेवट हें शरीर व माया हें यांचें मूळ होय. मूळापासून शेंड्यापर्यंतचे जे चौदा संकेत ते च जीवाच्या चौदा पिंड्या होत.

चौदा पांच येकोणीस । येकोणीस चारी तेवीस ।
या मध्यें मूळ चतुर्दश । पाहिलें चि पहावें ॥

असें सांगून पुढें नवव्या समासांत हे संकेत पिण्डांत कसे आहेत तें सोपपत्तिक दाखविलें आहे. पण श्रोत्यानें विचार केला पाहिजे कीं, निवृत्तिपंथानें आपल्याला हे कितपत आंगवितां येतील. हे आत्मसात् करितां नाहीं आले, तर प्रत्यय कोठून येणार ? मग सर्व च फ़ोल अथवा माइक. व्यवहारांत तर रेषा पुसल्या जातात हें प्रत्यक्ष आपण पहातों च, मग वर निर्दिष्ट केलेल्या चार रेषा पुसल्या जाणार नाहींत असें मानलें तर डोळेझाकणी केल्यासारखें होईल. म्हणून श्रीसमर्थ बजावून सांगतात कीं, सकळांना जें मान्य त्याच्या नादीं लागून अनुमानांत पडूं नका व मुख्य निश्चयास चुकूं नका; अर्थात् त्याला च अनन्य रहा.



## ( १३ )

# श्रीसमर्थांची आणखी एक चतुःसूत्री

( लेखक – रा. अनंत सखाराम वर्णीकर, अहमदाबाद )

श्रीसमर्थांनीं आपलें सगळें आयुष्य तत्वांचा विचार करून तीं सर्व प्रत्यक्ष आचारांत आणून जनहितार्थ त्यांचा प्रचार करण्यांत घालविलें व सिद्ध केलें कीं, आचारविचार शुद्ध ठेवल्यास कोणता हि व्यवहार चोख करतां येतो.

आचारविचार शुद्ध ठेवण्यासाठीं श्रीसमर्थांची आज्ञा किती कडक होती हें त्यांच्या ग्रंथांतून ठिकठिकाणीं स्पष्ट दिसून येणार आहे. त्यांतून दोन चार च वचनें पाहूं, म्हणजे सहज कल्पना येईल. इतर संतांनीं ज्या मार्गाचें अवलंबन करून जनहित साधलें, त्या च मार्गानें, परंतु तो मार्ग जास्त विस्तारानें विशद करून, श्रीसमर्थांनीं जनहित साधलें. आचारविचार शुद्ध ठेवून च सर्व कार्य करावें, अशी श्रीसमर्थांची स्पष्ट आज्ञा आहे. यासाठीं एक चतुःसूत्री त्यांनीं सूत्ररूपानें सांगितली आहे. कित्येकांच्या मतानें श्रीसमर्थांची चतुःसूत्री खालील होय.

मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्वविषईं ॥ ११-५-४
चौथा अत्यंत साक्षप ।

पण माझ्या अल्प समजुतीप्रमाणें ही चतुःसूत्री प्रकरणप्रसंगानें सांगितलेली आहे. सर्वसामान्य व त्रिकालाबाधित अशी श्रीसमर्थांची चतुःसूत्री म्हणजे

आधीं तें करावें कर्म । कर्ममार्गें उपासना ।
उपासकां सांपडे ज्ञान । ज्ञानें मोक्ष चि पावणें ॥

ही होय. यांत प्रथम कर्म करण्यास सांगितलें आहे. श्रीसमर्थांचे समर्थ श्रीराम यांनीं या कर्मांचा स्पष्ट उल्लेख रामगीतेंत केला आहे. लक्ष्मणानें जेव्हां विनम्रभावानें रामास प्रश्न केला कीं, रामा, या अज्ञानरूपी समुद्रांतून तरून जाण्याचा कांहीं उपाय सांगा, तेव्हा श्रीरामानें रामगीता लक्ष्मणास सांगितली. उपदेशाचा प्रकार वर उल्लेखिल्याप्रमाणे आहे तो असा :

आदौ स्ववर्णाश्रमवर्णिताः क्रियाः । कृत्वा समासादितशुद्धमानसः ।

ही च क्रिया किंवा कर्म दासबोधामध्यें श्रीसमर्थांनीं जास्त स्पष्ट रूपानें दाखविलें आहे.

कर्ममार्ग उपासनामार्ग । ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग ।
प्रवृत्तिमार्ग निवृत्तिमार्ग । सकळ जाणावे ॥ २–९–३१

नाहीं उपासनेचा आधार । तो परमार्थ निराधार ।
कर्मेंविण अनाचार । भ्रष्ट होती ॥ ५–२–५१

आचार उपासना सोडिती । ते भ्रष्ट अभक्त दिसती ।
जळो तयांची महंती । कोण पुसे ॥ ५६

कर्म उपासनेचा अभाव । तेथें भक्ताधेसि आला ठाव ।
तो कानकोंडा समुदाव । प्रपंची हांसती ॥ ५७

अशीं पुष्कळ वचनें त्यांच्या ग्रंथांत आढळतात. यावरून स्पष्ट होतें कीं, श्रीसमर्थांना आचारविचार सोडून कोणती च प्रवृत्ति मान्य नव्हती.

आजच्या वातावरणांत हे विचार वाचून थोडें चुकल्यासारखें वाटतें व तें साहजिक आहे. परंतु श्रीसमर्थांचें संपूर्ण वाङ्मय वाचून मग विचार केला असतां खात्री होईल कीं, त्यांचें वागणें केव्हां हि एकांगी नव्हतें. रथाला ज्याप्रमाणें दोन चाकांची जरुरी, त्याचप्रमाणें समर्थांनीं प्रवृत्तिमार्ग व निवृत्तिमार्ग हे दोन्हीं आवश्यक जाणून, ते उत्तम समजावून त्यांचें महत्त्व सिद्ध करून दाखविलें आहे. श्रीसमर्थांच्या ग्रंथांत एकादें वचन एकांगी आढळलें, तर बुचकळ्यांत न पडतां पुढें शोध करावा म्हणजे खुलासा होतो. उदाहरणार्थ—

प्रातःकाळीं उठावें । कांहीं पाठांतर करावें ।
येथानशक्ति आठवावें । सर्वोत्तमासी ॥ ११–३–१५

मुखमार्जन प्रातःस्नान । संध्या तर्पण देवतार्चन ।
पुढें वैश्यदेवउपासन । येथासांग ॥ १७

ज्या ज्याचा जो व्यापार । तेथें असावें खबरदार ।
दुश्चितपणें तरी पोर । वेढा लावी ॥ १९

या वचनांत संध्यावंदन, देवतार्चन करण्यास जितक्या आग्रहानें सांगितलें आहे, तितक्या च आग्रहानें, आपआपल्या व्यापारांत दक्ष रहाण्यास सांगितलें आहे,

इतकें च नव्हे, परंतु स्पष्ट सुचवलें आहे कीं, तेथें जर चुकल, तर एखादें घोर हि तुम्हांस फसवून जाईल.

श्रीमत् दासबोधाख्य ग्रंथराज हें नांव दिलें आहे तें यथार्थ आहे. दासबोध ग्रंथांत वाक्य तीं विशद करून दाखविलें आहे, तरी असें म्हणावें लागतें कीं, दासबोध हा ग्रंथ सूत्ररूपानें आहे व श्रीसमर्थांचें इतर वाङ्मय त्या ग्रंथावरील भाष्यें होत. कोणता हि ग्रंथ हातीं घेऊन तो वाचूं लागल्यावर त्यांतील कांहीं भाग किंवा शब्द न लागले, तर आपण शास्त्याकडे जातों किंवा कोशाचें साहाय्य घेतों; तद्वत् *श्री ग्रंथराज दासबोधांतील* कांहीं भाग न लागला तर अस्वस्थ न होतां, श्रीसमर्थांच्या इतर ग्रंथांचें — कीं, ज्यांना भाष्य किंवा कोश म्हणतां येईल — साहाय्य घ्यावें, जरूर खुलासा होईल.

तात्पर्य, श्रीसमर्थांच्या कृपेची अपेक्षा असेल तर त्यांच्या आज्ञा मोडून चालणार नाहीं. महाराष्ट्राचें प्रेम श्रीसमर्थांवर आहे व रहाणार; परंतु खरें प्रेम केव्हां प्रत्ययाला येईल ? जेव्हां महाराष्ट्र पुन्हां समर्थांच्या आज्ञा संपूर्ण पालन करण्याचें व्रत घेईल तेव्हां च ! *श्रीसमर्थसंघाच्या समासदांनीं तर श्रीसमर्थांच्या* आज्ञांचें अवश्य पालन करावें व दुसऱ्यांस मार्गदर्शक व्हावें, अशी विनंति आहे.



( १४ )

## ह्या ' अंबिका ' कोणत्या ?

### ( लेखक — रा. अनंतदास रामदासी, गिरड )

अनेक उपासक मायबहिणींच्या मुखांतून पुढील गोड पद ऐकण्यांत आलें. त्यांतील मधुर भाव पाहून वाटलें कीं, वाळवे मठाच्या संस्थापिका अंबिका यांनीं तर आपला ' नाशिवंत देह ओवाळून ' राघोबाची ही दृष्ट काढली नसेल ? कोणत्या ' अंबिका ' बाईनें ही ' दृष्ट ' काढली त्याचा निर्णय व्हावा म्हणून जसें ऐकलें तसेंच तें पद खालीं देत आहे.

दृष्ट

मुगुट मनोहर वैजयंती हीरा ।
ग । मुगुट मनोहर वैजयंती हीरा ॥

केशर कस्तूरी लावूनी भाळा ।
ग । केशर कस्तूरी लावूनी भाळा ॥

मकराकार कुंडलें शोभतीं श्रवणीं ।
दृष्ट उतरा गे तुम्ही साजणी ।
दृष्ट उतरा गे सावळ्यावरुनी ।
लोण उतरा गे सावळ्या वरुनी ॥ १ ॥

नाशिवंत देहे हा टाका ओवाळुनी ।
दृष्ट उतरा गे सावळ्यावरुनी ।
दृष्ट उतरा गे राघोबावरुनी ॥ ध्रु० ॥

काम क्रोध लोभ मोहोन्या मिरच्या हातीं ।
ग । काम क्रोध लोभ मोहोन्या मिरच्या हातीं ॥

आशा मनशा तृष्णा करा यांची माती ।
ग । आशा मनशा तृष्णा करा यांची माती ॥
त्रिगुण खडे ओवाळूं ज्ञानज्योती ।
ग । त्रिगुण खडे ओवाळूं ज्ञानज्योती ॥
शांतिक्षमेचें शिंपडा पाणी ।
दृष्ट उतरा गे तुम्ही साजणी ।
लोण उतरा गे सावळ्यावरुनी ॥ २ ॥

जळो जळो दृष्ट कुठें जाली याला ।
ग । जळो जळो दृष्ट कुठें जाली याला ॥
मारिले दैत्य तेथें झडपला ।
ग । मारिले दैत्य तेथें दृष्यवला ॥
अवतार घेउनी खेळे बाळलीला ।
ग । अवतार घेउनी खेळे बाळलीला ॥
पीतांबरसोगा लोळतो चरणीं ।
दृष्ट उतरा गे राघोबावरुनी ।
लोण उतरा गे सावळ्यावरुनी ॥ ३ ॥

परब्रह्म मूर्ती खेळे राया ( नंदा ) घरीं ।
ग । परब्रह्म मूर्ती खेळे राया ( नंदा ) घरीं ॥
धन्य ती कौसल्या, राम अंकावरी ।
ग । धन्य ती यशोदा, कृष्ण अंकावरी ॥
जडमूढ अंबिका लोळे चरणावरी ।
दृष्ट उतरा गे तुम्ही साजणी ।
लोण उतरा गे सावळ्यावरुनी ॥ ४ ॥



( १५ )

॥ श्रीराम ॥

# सत्कार्योत्तेजक सभा – धुळें

## – स्थापना, घटना, कार्यें, भवितव्य –

( १ ) मनुष्याच्या आयुष्यांत एक काळ असा येत असतो कीं, ज्यांची आपण काळजी वाहिली त्यांच्यावर आपली काळजी करण्याचा प्रसंग येतो, ज्यांच्यावर आपण – त्यांच्या कल्याणासाठीं च कां होईना, पण – सत्ता चालविली त्यांच्या सत्तेखालीं आपणांस जावें लागतें, ज्यांना आपण आपल्या तंत्रानें वागविलें त्यांच्या तंत्रानें आपणांस वागावें लागतें. असा काळ माझ्या आयुष्यांत येऊं पहात आहे. आयुष्याचा उत्तर काळ सुरू झाला म्हणजे माणसाचें शरीर आणि बुद्धि हीं लहानाळतात आणि त्या मानानें त्याच्या ठिकाणीं पराधीनता येते. मला या स्थितीची जाणीव होऊं लागली आहे. श्री रामदास आणि रामदासी मासिकाच्या चिरंजीव संपादकांनीं आज्ञा केली कीं, आपल्या जन्माच्या हि पूर्वी ज्या सभेची स्थापना झाली, त्या सत्कार्योत्तेजक सभेचा वृत्तान्त जितका मोकळेपणानें सांगतां येईल तितका एकवार सांगावा. म्हणून, एरव्हीं कदापि सांगितल्या नसत्या अशा हि कोहीं गोष्टी कदाचित् या लेखांत लेखणींतून उतरतील. तसें झाल्यास वाचकांची क्षमाई दृष्टि असावी.

( २ ) पूर्वजन्मींचें व चालू जन्म देणारांपासून मिळालेलें भांडवल विचारांत न घेतलें तरी जन्मापासून मरेपर्यंत प्रत्येकाच्या मनावर सर्व बाजूंनीं आणि हजारों दिशांनीं, बरे अगर वाईट संस्कार सारखे होत असतात. आपल्यांतील चांगले आणि वाईट कोणते गुण आपण कोणापासून घेतले, आपल्यांतील सहज गुणदोष कोणते आणि आगंतुक कोणते, आपल्या शरीरावर आणि मनावर कोणत्या परि-स्थितींत कोणते संस्कार पडले, हें सर्व, प्रत्येक माणसास विचारान्तीं कळणें आणि सांगतां येणें शक्य आहे.

( ३ ) या दृष्टीनें इ. स. १८९० ते १८९३ हीं चार वर्षे माझ्या आयुष्यां-तील माझ्या पुरती फार महत्त्वाची गेलीं. हीं चार वर्षे मी पुण्यांत होतों. त्यांना

घेणाऱ्या च ठाऊक नव्हतें, पण त्या चार वर्षांत कैलासवासी लोकमान्य बळवंतराव टिळक, गोपाळराव गोखले, वासुदेवराव केळकर, वामनराव आपटे, गोपाळराव आगरकर, माधवराव गोळे, डॉक्टर भांडारकर, गोविंदराव करकरे व विद्यमान कर्मयोगी धोंडोपंत कर्वे इत्यादि महान् थोर व्यक्तींच्या सहवासांत मी होतों. हे सर्व मला शिक्षक होते. त्यांना ठाऊक नव्हतें आणि नाहीं, हें मी पुन्हां सांगतों, पण या सर्वांचें व इतरांचें मी किती तरी ऋण लागतो. त्या वेळीं पुण्यांत, विद्यार्थीदशेपासून च शाळीयुवा म्हणून ओळखले जाणारे कैलासवासी करंदीकर व विद्यमान शंकरराव लवाटे यांची सद्वर्तनप्रवर्तक मंडळी नांवाची एक संस्था होती. त्या संस्थेचा हि मी ऋणी आहें. सहाध्यायी मित्रांपैकीं कैलासवासी व्यंकटेश गोविंद साने, गोविंद काशीनाथ चांदोरकर, शंकर भय्या भांडे व विद्यमान गोविंद चिमणाजी भाटे, हे माझे चार प्रमुख सावकार होते. अशा आणखी किती तरी ज्ञात आणि मला हि अज्ञात असलेल्या व्यक्तींचें मी देणें लागत आहे. घरच्या सावकारांचा उल्लेख खाजगी स्वरूपाचा होईल, म्हणून त्यांच्या विषयीं, या प्रकाशित होणाऱ्या लेखांत बोलत नाहीं.

( ४ ) या सर्व लोकोत्तर पुरुषांचें ऋण घेऊन उन्हाळ्याच्या सुट्टींत धुळ्यास यावें, मित्रमंडळी जमवावी, त्यांना पुण्याचें वैभव सांगावें आणि त्यांच्याबरोबर संवाद करावा. अशा स्थितींत इ. स. १८९३ त एका रात्रीं करंदीकरांच्या माडीवर विनोदमूर्ति कै. विनायक जनार्दन ऊर्फ बापुराव करंदीकर म्हणजे विख्यात विनायक कवि, शांतिब्रह्म कै. माधवराव धाणेकर, सत्त्वशील कै. काशीनाथ पांडुरंग ऊर्फ काका पिंपळखरे आणि मी, अशा चौघांनीं एकत्र जमून पुण्याच्या सद्वर्तनप्रवर्तक मंडळीच्या धर्तीवर आपण एक मंडळी स्थापावी, असा संकल्प केला. **सत्कार्योत्तेजक मंडळी** असें नामाभिधान योजण्यांत आलें आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं विनायक कवीनें एक श्लोकाष्टक तयार करून आणून दिलें. त्याचीं शेवटचीं दोन चरणें

> भाषा प्राकृत उन्नतीस चढवा, काया करा अर्पण ।
>
> आर्यावर्तहितास, द्या सतत सत्कार्यास उत्तेजन ॥

अशीं होती. ' आर्यावर्त ' या नांवाचें, आमच्या धोरणानें चालणारें, त्या वेळीं येथें एक वर्तमानपत्र हि निघत असे.

( ५ ) त्या वेळीं धुळ्यास कै. गणेश जनार्दन आगाशे हे इंग्रजी शाळेवर हेड मास्तर होते. इ. स. १८८९ त मी सातवींत असतां च ते प्रथम धुळ्यास आले होते. त्यांचा मजवर पुत्रवत् अति लोभ होता. त्यांच्या अध्यक्षतेखालीं खोलगल्लींतील त्या वेळीं असलेल्या एका खाजगी [illegible] च्या इमारतींत ५।५९



लोकमान्य

रा. शंकर वासुदेव जोग
धुळें

रा. गोविंद धोंडो मसूरकर
धुळें



कै. काशिनाथ पांडुरंग पिंपळखरे



कै. विनायक जनार्दन करंदीकर, धुळें

समवयस्कांची सभा भरून सत्कार्योत्तेजक मंडळीची स्थापना जाहीरपणें झाली. सभेंत रा. कृष्णराव पुंडलिक यांनीं, इतकें मोठें नांव कशाला, मोठें नांव आज घ्यावें आणि उद्यां बुडवावें, हें ठीक नव्हे, असा आक्षेप घेतला आणि मी बोलून गेलों, मी जिवंत आहे तोंवर तरी हें नांव बुडूं देणार नाहीं. कै. गुरुवर्य आगाशे यांनीं आशीर्वाद दिला.

( ६ ) आरंभीं कांहीं वर्षें, उन्हाळ्याच्या सुट्टींत नदीच्या वाळवंटांत शारीरिक खेळ खेळणें, **Sir Henry Cotton** यांच्या **New** कां **Young India** ग्रन्थासारखा एकादा ग्रन्थ नेमून तो सर्वांनीं वाचून त्यावर चर्चा करणें, त्या वेळच्या सरकारी हायस्कूलच्या इमारतींत किंवा आवारांत स्वतंत्र व्याख्यानमाला गुंफणें, एवढीं च कार्यें मंडळीकडून होत होतीं. त्या कार्यांत कै. नारायण बळवंत पेंडसे, एम्. ए. एल्एल्. बी., कै. गोविंद नारायण टकले बी. ए., कै. विष्णुपंत घासारकर वकील, कै. विश्वनाथ अमृत पळशीकर वकील, कै. विष्णु परशुराम रावेरकर, बी. ए. एल्एल्. बी. फर्स्ट क्लास सबजज्य, रा. कृष्णराव नारायण भणगे वकील, वगैरे पांच पंचवीस मंडळी भाग घेत असत. कांहीं काळ हा कार्यक्रम चालला, पण, जसे पक्षी दाही दिशा उडोन जाती, त्याप्रमाणें निरनिराळ्या व्यवसायांच्या कारणानें या मंडळींची पांगापांग होत गेली. जागेवर फार थोडी मंडळी उरली. मी मात्र एल्एल्. बी. होऊन येथें च वकिली करूं लागलों. आगें मागें रा. भास्कर वामन ऊर्फ तात्यासाहेब भट व कै. गोविंद काशीनाथ ऊर्फ नानासाहेब चांदोरकर वकील होऊन येथें च आले.

( ७ ) श्रीशिवजन्मोत्सव, श्रीगणेशोत्सव, दसरासंमेलन वगैरे उत्सव होऊं लागले, पण मुख्य लक्ष श्रीसमर्थचरणाकडे आणि त्यांच्या वाङ्मयाकडे लागलें. कॉलेजपासून च शास्त्रीबुवांची निबंधमाला आणि श्रीसमर्थांचे समग्र ग्रन्थ उशाशीं असत. या च सुमारास **कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे** यांचा श्री रामदासांवरील निबंध प्रसिद्ध झाला. त्यांना उपलब्ध झालेली श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाची हस्तलिखित प्रत त्यांच्यापासून मिळविली, पण तिच्यायोगें पूर्ण समाधान न झाल्यामुळें जास्त संशोधन करण्यास सुरुवात झाली. पुढें दहा पंधरा वर्षें, उन्हाळ्याची सुट्टी, नाताळची सुट्टी आणि केव्हां केव्हां दिवाळीची सुट्टी हि श्रीसमर्थांचे मठ धुंडण्याकडे खर्च होऊं लागली. कांहीं मोफत, कांहीं विकत, कांहीं लग्नमुंजीसारख्या कार्यप्रसंगीं द्रव्य देऊन हस्तलिखितांचा संग्रह मिळत चालला. या संशोधनदौऱ्यांत कै. नानासाहेब चांदोरकर, कै. वासुदेव विष्णु ऊर्फ आप्पासाहेब शिंदोरे, रा. तात्यासाहेब भट, रा. गोपाळराव गोगटे वगैरे मित्रमंडळी मजबरोबर केव्हां असत केव्हां नसत, पण **रा. विष्णु सीताराम ऊर्फ आप्पासाहेब रणदिवे** यांच्याशिवाय मी बहुधा संशोधन-

दौऱ्यावर जात नसे. त्यांचा आणि माझा काय ऋणानुबंध असेल तो सांगतां येत नाहीं, पण या दौऱ्यांत सहकारी मित्र, खाजगी चिटणीस, कारकून, सोबती, फार काय, पण माझी सर्वतोपरि काळजी वाहणारा रक्षक दूत, इत्यादि नात्यांनीं त्यांनीं माझ्या उपयोगीं पडावें. त्यांच्या संगतीवांचून मला हे दौरे काढतां च आले नसते, हें सत्य आहे. संशोधनांत ते तरबेज झाले आहेत. श्रीशिवसमर्थकालीन मोडी पत्रें जशीं ते बिनचूक वाचतात, तितकीं तीं मला लागत नाहींत. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें – खंड पंधरावा, यांत आलेलीं श्रीशिवकालीन कागदपत्रें मावळसोन्यांत हिंडून मिळवून तत्काळ त्यांच्या नकला करून घेण्यासाठीं कै. राजवाडे यांनीं आप्पासाहेब रणदिवे यांना मजपासून मागून घेतले होते, जणूं मी आप्पासाहेबांचा साहेब होतो. त्या खंडांतील सर्व पत्रांच्या नकला आप्पासाहेबांनीं केलेल्या आहेत.

( ८ ) याप्रमाणें संशोधनदौऱ्यांत आप्पासाहेबांची मला एक प्रकारची मदत व्हावी, तर अनेक प्रकारांनीं माझे बंधु **कै. तीं. डॉ. हरि श्रीकृष्ण देव** यांचें मला एकसारखें साहाय्य मिळत असे, तें किती आणि कसें हें माझा मी जाणें. डॉक्टर देव यांच्याशीं ज्यांचा संबंध येई ते त्यांना देवमाणूस समजत व तसे ते होते हि. त्यांच्या मार्गें स्वतःचा प्रपंच टरला नव्हता. शेवटीं शेवटीं त्यांना चारशें रुपये पगार होता, पण तो सर्व दरमहाचे दरमहा इतरांच्या उपयोगीं पडण्यांत खर्च होत असे, इतकें च नव्हे, तर स्वतः कर्ज काढून त्यांनीं इतरांची गरज भागवावी, दुसऱ्यांचीं कर्जें फेडावीं. गरीब विद्यार्थ्यांना दरमहा साहाय्य करण्यांत त्यांचा बरा च पगार खर्च होई. त्यांच्या मदतीनें शिक्षण मिळवून उच्च पदास चढलेले कित्येक जण आज सुस्थितींत आहेत.

( ९ ) अशा सर्वतोपरि अनुकूल परिस्थितींत **" श्री रामदास आणि रामदासी "** ग्रन्थमाला प्रकाशित करण्याचें कार्य सुरू झालें. श्रीकल्याणस्वामींच्या हातच्या प्रतीवरून श्रीमद् ग्रन्थराज दासबोध प्रस्तावनेसह प्रथम जेव्हां इ. स. १९०५ त प्रसिद्ध झाला, तेव्हां महाराष्ट्रानें त्याचें उत्तम स्वागत केलें. तत्कालीन महाराष्ट्रांतील तरुणांना **दासबोधाची प्रस्तावना** अपूर्व वाटली व फार आवडली. त्या प्रस्तावनेनें श्रीसमर्थवाङ्मयाकडे आपलें लक्ष प्रथम वेधलें, असें पुष्कळांनीं समक्ष व पत्रद्वारें मला कळविलें आहे. दहा बारा ग्रन्थ स्वतंत्रपणें प्रसिद्ध झाल्यावर इ. स. १९१५ पासून ' श्री रामदास आणि रामदासी ' मासिक पुस्तक सुरू झालें. पुढचे ग्रन्थ मासिक पुस्तकाच्या द्वारें प्रकाशित झाले. आजपर्यंत रामदास आणि रामदासी ग्रंथमालेचे ३९ ग्रन्थ प्रसिद्ध झाले आहेत व असे ३९० प्रसिद्ध होतील, इतकी सामुग्री आज च श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत गोळा झालेली आहे.

( १० ) येथवर सर्व कारभार एकतंत्री च चाले. पुढें कै. राजवाडे आणि कै. चांदोरकर यांचें विशेष साहाय्य मिळूं लागलें. तेव्हां **' श्री रामदास आणि**

रामदासी ' मासिकाच्या जोडीला ' इतिहास आणि ऐतिहासिक ' व ' कवि आणि काव्य ' अशीं दोन मासिकें सुरू करावीं, असा विचार होऊन इतिहास आणि ऐतिहासिक मासिक सुरू हि करण्यांत आलें. पण तीन वर्षे तें चालवून लोकाश्रयाच्या अभावीं बंद करावें लागलें. ' कवि आणि काव्य ' मासिक, कल्पनेच्या प्रांतांतून कधीं बाहेर च पडलें नाहीं. याचें तात्पर्य इतकें च कीं, अशीं तीन स्वतंत्र मासिकें अव्याहत चालावीं, इतकी सामुग्री सत्कार्योत्तेजक सभेनें गोळा केलेली आहे, पण तीं पोसण्याची पात्रता महाराष्ट्रजनतेंत अजून आलेली नाहीं. सामान्य जनतेंतील पुरोगामी वाङ्मयाचा बहर ओसरला, विनोदाचा काळ जाऊन गांभीर्याचा काळ आला, पारतंत्र्याची जाणीव होऊन त्याची खंती वाढूं लागली, तो आणि ती यांच्या कथा लोपून वीर स्त्रीपुरुषांच्या कथा ऐकण्याची आवड वाढत चालली, आपल्या मूळ स्वरूपाची ओळख पटली आणि कर्तव्याची दिशा दिसूं लागली, म्हणजे पाश्चात्य राष्ट्रांतल्याप्रमाणें असलीं तीन च काय, तीनशें मासिकें महाराष्ट्रांत निघतील आणि सुखानें चालतील. तो काळ अजून यावयाचा आहे.

( ११ ) संशोधनार्थ श्रीसमर्थस्थापित मठ धुंडीत असतां श्रीसमर्थांची जन्मभूमि **श्री क्षेत्र जांब** येथें दोन चार वेळां जाणें झालें होतें. श्रीसमर्थांचें जें घर होतें तें मूळ स्वरूपांत राहिलेलें नव्हतें. घरटा तो च, पण त्या जागेवरील मूळ घर जाऊन त्या ऐवजी एक लहानसें तात्पुरतें मातीचें घर अलिकडे बांधून त्यांत एक अन्य जातीचें कुटुम्ब रहात होतें. तें घर मिळवून जागा साफ करण्यांत आली. तींत आणखी शेजारची जागा सार्वजनिक पैशानें विकत घेऊन सामील करण्यांत आली. श्रीसमर्थांच्या मूळच्या जागीं, ज्या जागीं धरणीमातेनें त्यांचा देह प्रथम झेलला त्या जागीं, त्या जागेचें स्मारक म्हणून **श्रीसमर्थमंदिर** उभारलें जावें, अशी तीव्र इच्छा झाली. संकल्प केला आणि तो वृद्धमहाराष्ट्राच्या कानावर घातला. चाफळमठाधिपति कै. बापुसाहेब महाराज यांचा आशीर्वाद मिळविला. या च सुमारास हैद्राबादचे **धर्मवीर कै. वामनराव नाईक साहेब** सहकुटुम्ब काश्मीरकडे जात असतां मार्गांत धुळ्यास मजकडे उतरले होते. केलेला संकल्प त्यांना विदित केला. त्यांनीं सर्वतोपरि साहाय्य करण्याचें आश्वासन दिलें. निजामसरकारची परवानगी मिळवून दिली. मंदिर बांधण्यास खर्चाचा अंदाज पंधरा हजारांचा केला होता, पण काम वाढत वाढत चाळीस हजारांच्या वर गेलें. देवागार उभारलें आणि श्रीसमर्थांवरील भक्तिप्रेमानें महाराष्ट्रीयांनीं लागेल तेवढा पैसा पुरविला. धंद्यांत व्यत्यय येऊं नये, द्रव्याच्या अभावीं काम बंद पडूं नये म्हणून इ. स. १९२८ च्या जून पासून नवीन पत्रीलेख देण्याचें बंद करणें लागलें. धंद्याचा एक प्रसंग असा झाला की, महाराष्ट्रीयांत

श्रीसमर्थांविषयीं किती निस्सीम भक्तिप्रेम वसत आहे, त्याचा मला प्रत्यय आला. चार; साडे चार वर्षे मंदिराचें काम चाललें. त्याचा जमाखर्च श्रीरामदासी मासिकांत येत गेला. पैसा केव्हां च कमी पडला नाहीं. शके १८५४ चैत्र शु. ९ स ( १५-४-१९३२ ) प्राणप्रतिष्ठेचा समारंभ अपूर्व झाला. समारंभांतीलर्च झालेल्या अन्नदानाचा सर्व खर्च कै. वामनराव नाईक साहेब यांनीं केला. विश्वस्तमंडळ मंदिराची व्यवस्था पहात आहे. या मंदिराची इत्थंभूत सचित्र हकिकत ' **श्रीसमर्थमंदिर-जांब** ' या सचित्र पुस्तकांत दिली आहे.

( १२ ) जांब, चाफळ आणि सज्जनगड म्हणजे श्रीसमर्थांची जन्मभूमि, कर्मभूमि आणि चिरंतनविश्रांतिभूमि, अशी श्रीसांप्रदायिकांची त्रिस्थळी होय. जांबेस वर्षांतून दोन वेळां भक्तजन जमत असतात: चैत्र शु. ७, ८, ९ स व मार्गशीर्ष शु. ११, १२, १३ स. जांब हें एक लहानसें खेडें आहे. श्रीसमर्थांच्या साठीं आल्यागेलेल्यांना उतरण्याची तेथें पूर्वी सोय नव्हती. ती आतां इंदुरच्या महाराणी श्रीमंत सौ. मा. इंदिराबाईसाहेब होळकर यांच्या कृपेनें चांगली झाली आहे. मंदिराच्या शेजारीं पूर्वेस पाटीलवाड्याची मोठी थोरली मोकळी जागा पडली होती. तींत अनेक हिस्सेदार होते. त्यांपैकीं कांहींनीं बक्षीस व इतरांनीं पैसे घेऊन आपआपला हिस्सा विश्वस्त या नात्यानें कै. नाईक साहेब आणि मी यांच्या नांवानें करून दिला. श्री देवी अहिल्याबाई यांच्या पुण्यस्मरणार्थ **श्रीमंत सौ. मा. इंदिराबाई साहेब** यांनीं एकदम पांच हजारांची देणगी दिल्यामुळें पाटीलवाड्याच्या जागीं दहा बारा हजारांचें ' **श्रीदासविश्रामधाम** ' नांवाचें सुंदर निवासस्थान बांधण्यांत आलें आहे.

( १३ ) मंदिरांतील शिस्त अत्यंत कडक आहे. आपलीं मंदिरें किती रमणीय आणि निर्मळ, किती शांत आणि चित्त प्रसन्न करणारीं असावींत, याचा श्रीसमर्थमंदिर हा उत्कृष्ट नमुना होय. पूजा करणारे आणि दर्शनास येणारे यांच्या-करितां कायमचे सक्त नियम घालून देण्यांत आले आहेत. या स्थानाकडे दिवसानुदिवस महाराष्ट्रीयांचें विशेष लक्ष लागत जाणार आहे, हें मला ठाऊक झालें आहे. महाराष्ट्रीयांचें हें गुरुस्थान होय. आयुष्यांत एकवार तरी त्याचें दर्शन घेतल्यावांचून कोणा हि महाराष्ट्रीयानें राहूं नये. तें स्फूर्तिदायक आणि स्वस्वरूपाची ओळख पटविणारें आहे. प्रत्यय पहावा.

( १४ ) वर्षानुवर्ष संशोधन चालूं असतां हस्तलिखितांचा संग्रह इतका वाढत गेला कीं, आपल्या पश्चात् त्याचें रक्षण कसें होणार, याची चिंता वाटूं लागली. त्याची वर्णनात्मक यादी ( *Descriptive Catalogue* ) ' **श्रीराम-दासी संशोधन** ' या नांवानें श्रीरामदासी मासिकांत क्रमशः प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. संशोधनाचा पहिला खंड, सूचीसह ४७० पृष्ठांचा झाला. त्याच्या



श्रीमंत प्रतापशेट, अमळनेर



. वामन नाईकसाहेब, हैद्राबाद



रा. गोपाळ रावजी गोगटे भुसावळ



रा. अनंत सखाराम वणीकर

प्रस्तावनेंत वरील चिंता व्यक्त केली व श्री क्षेत्र जांब येथें श्रीसमर्थमंदिर झालें, आतां या संग्रहाच्या चिरंतन रक्षणार्थ, शक्य तर संवर्धनार्थ आणि यथावकाश प्रकाशनार्थ धुळें येथें **श्रीसमर्थवाग्देवतामंदिर** व्हावें, अशी तीव्र इच्छा दर्शविली. महाराष्ट्रीयांच्या श्रीसमर्थभक्तिप्रेमामुळें सहा महिन्यांच्या आंत ती सफल झाली. भूमिपूजन, इमारतीला आरंभ, मंदिराचें उद्घाटन, यांचे मुहूर्त ठरवून टाकले आणि तत्काळ पंधरा सोळा हजार रुपये गोळा होऊन ठरलेल्या मुहूर्तांवर सर्व कामें पार पडलीं. मंदिराचें उद्घाटन शके १८५७ च्या ज्येष्ठ शुद्ध १३ च्या शुभ मुहूर्तावर श्रीसद्गुरुभक्त **श्रीमंत सौ. मा. महाराणी इंदिराबाई साहेब होळकर** यांच्या हस्तें झालें. उद्घाटनसमारंभ अपूर्व झाला. तो ज्यांनीं अवलोकिला त्यांना त्याचें स्मरण अखंड राहील. त्या दिवशीं नोंदलेल्या न्यासपत्रानें मंदिरासह हा सारा संग्रह, महाराष्ट्रीयांच्या चिरंतन उपयोगासाठीं ( १ ) श्री. जनार्दन सखाराम करंदीकर, बी. ए. एल् एल्. बी., पुणें ( २ ) श्री. जगन्नाथ रघुनाथ धारपुरे, बी. ए. एल् एल्. बी., मुंबई ( ३ ) श्री. गणेश वासुदेव मावळंकर, बी. ए. एल् एल्. बी., अहमदाबाद ( ४ ) श्री. गंगाधर नीळकंठ गोखले, एल्. सी. ई., कराची ( ५ ) श्रीमंत सरदार माधवराव विनायक किबे, एम्. ए., इंदुर ( ६ ) डॉ. लक्ष्मण वासुदेव परांजपे, एल्. एम्. अँड एस्., नागपुर ( ७ ) श्रीमंत वामनराव रामचंद्र नाईक, जहागीरदार, हैद्राबाद ( ८ ) श्रीमंत मोतीलाल माणकचंद ऊर्फ प्रतापशेठ, अमळनेर ( ९ ) श्रीमंत कृष्णराव आनंदराव वारगळ, जहागीरदार, तळोदे ( १० ) श्री. गोपाळ रावजी गोगटे, बी. ए., एल् एल्. बी., भुसावळ ( ११ ) श्री. भास्कर वामन भट, वकील, धुळें ( १२ ) श्री. विष्णु सीताराम रणदिवे, धुळें ( १३ ) श्री. शंकर श्रीकृष्ण देव, बी. ए., एल् एल्. बी., धुळें, अशा तेरा जणांच्या विश्वस्तमंडळाच्या हवालीं करण्यांत आला. समारंभासाठीं पस्तीस नामांकित लेखकांकडून श्रीसमर्थचरित्रग्रन्थसंप्रदायादिविषयक पस्तीस निबंध आले होते. त्यांचा हार गुंफून श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं **पहिला सुमनहार** म्हणून अर्पण केला. तेव्हांपासून असले हार गुंफण्याची प्रथा चालू झाली, ती अखंड चालू रहावी, अशी श्रीचरणीं माझी प्रार्थना आहे.

( १५ ) संग्रहाच्या वर्णनात्मक यादीचा दुसरा खंड मासिकांत चालू च होता. तो दोन वर्षांमागें पुरा झाला. दोन्ही खंड मिळून ११०० पृष्ठें होतात व त्यांची किंमत ११ रुपये ठेवण्यांत आली आहे. या दोन्ही खंडांकडे साहित्यिकांचें जावें तितकें लक्ष अद्यापि गेलेलें नाहीं, पण केव्हां तरी जाईल, हें निश्चित आहे. हे खंड जो पाहील त्याच्या लक्षांत संग्रहाची अपूर्वता व उपयुक्तता येण्याला वेळ लागणार नाहीं. यदृच्छेनें संशोधन होऊन तिसऱ्या खंडाची हि सामुग्री जमूं लागली आहे व हा असा क्रम अव्याहत चालू च राहणार आहे. हें मंदिर

म्हणजे धुळ्यास आल्यावर कोणास हि एक प्रेक्षणीय स्थान झालें आहे. शेंकडों प्रेक्षक दरसाल येतात, मंदिराचें दर्शन घेतात, मंदिराचें कौतुक आणि माझें अभिनंदन करतात आणि जातात. परंतु मंदिरांतील वाग्देवतेचें प्रत्यक्ष दर्शन घेण्यास फार च थोडे जण येतात. तें दर्शन घेण्याला कांहीं दिवस येथें राहिलें पाहिजे. अशा दर्शनेच्छु अभ्यासकांच्या सोयीसाठीं मंदिरा शेजारीं २२०' X ८५' अशी मोकळी जागा दोन हजारांस विकत घेऊन त्या जागेवर, आजपर्यंत हजारों रुपयांनीं निविध कार्यास साहाय्य केलेले **श्री. अनंत सखाराम घणीकर** यांच्या वडिलांच्या स्मरणार्थ सुमारें अडीच हजार रुपये खर्च होऊन सर्व सोयीसह एक टुमदार **अभ्यागताश्रम** बांधण्यांत आला आहे. मंदिराचे विश्वस्त, सभेचे कार्यकर्ते, विद्यार्थी, मंदिरांतील संग्रह पाहण्यास मुद्दाम येऊन कांहीं दिवस राहून आपआपला व्यासंग करणारे साहित्यिक, मंदिराच्या निमित्तानें येणारे इतर पाहुणे, समारंभाला येणारे प्रतिनिधी या सर्वांची त्यामुळें उत्कृष्ट सोय झाली आहे. त्या दोन हजारांत एकट्या ना. दादासाहेबांचे एक हजार आहेत व अडीच हजारांत एकट्या रामेश्वरशेटजींचे आठशें आहेत.

( १६ ) मंदिराचा वार्षिक समारंभ ज्येष्ठ शु. १३ स होत असतो. त्या च दिवशीं विश्वस्तमंडळाची वार्षिक सभा भरविण्यांत येऊन मागील वर्षाचा कारभार पाहिला जातो व पुढील वर्षाचा ठरविला जातो. जाहीर समारंभांत वार्षिक अहवाल सादर करण्यांत येतो, निबंध वाचले जातात व अनेकांचीं भाषणें होतात. करंदीकर, केतकर, चापेकर, लाट, दांडेकर, शारदाबाई, गिरिजाबाई, पांगारकर, अणे, बालस्वामी, फाटक, सातवळेकर, माधळंकर, चौंडेमहाराज, ठोंबरे, निजसुरे, भट, गोगटे, टिळक, इत्यादिकांचीं भाषणें झालीं आहेत व गद्रे, भावे, आळतेकर, सनईवाले, ठाकूर, शिदोरे, अनंतदास, इत्यादिकांचे निबंध सादर करण्यांत आले आहेत. या व इतर निबंधांचे श्रीरामदासी मासिकाच्या द्वारें सुमनहार गुंफण्यांत येतात. मंदिराचे एक **परिचयपुस्तक** हि प्रसिद्ध करण्यांत आलें असून त्यांत मंदिराची घटना व नियम, मंदिरांतील संग्रहाचें स्वरूप, मंदिराचे सभासद, जाणत्यांचे कांहीं अभिप्राय, भावी कार्ये, इत्यादि गोष्टी नमूद केलेल्या आहेत. मंदिराचे सभासद सुमारें १५० आहेत.

( १७ ) गतवर्षापासून आणखी एक नवीन उपक्रम करण्यांत आला आहे. माझा एक प्रमुख ठाम सिद्धान्त असा आहे कीं, **श्रीसमर्थ म्हणजे महाराष्ट्राचे प्राण होत.** त्यांचें विस्मरण म्हणजे महाराष्ट्राचें मरण च होय. परंतु महाराष्ट्र श्रीसमर्थांचें अखंड स्मरण ठेवील तर महाराष्ट्र अमर होईल, त्याला कोणी मारूं शकणार नाहीं. माझ्या या सिद्धान्ताला श्री छत्रपति शिवाजी महाराजापासून तों सातारचे सर्व राजे आणि पुण्याचे सर्व श्रीमंत पेशवे आणि त्यांचे सरदार या

सर्वांची अनुमति असल्याचें त्यांच्या कागदपत्रांवरून दिसतें. म्हणून महाराष्ट्राला श्रीसमर्थचरणांचा केव्हां हि विसर पडूं नये, हा हेतु मनांत धरून जे जे उपाय योजावे ते ते थोडे च होणार आहेत. म्हणून गतवर्षी धुळें येथें ज्येष्ठ शु. १४ च्या दिवशीं **नामदार दादासाहेब मावळंकर** यांच्या अध्यक्षतेखालीं श्रीरामदासी संमेलन भरून **श्रीसमर्थसंघ** स्थापण्यांत आला. त्याचें घटनापत्रक स्वतंत्र काढण्यांत आलें आहे. हेतु हा आहे कीं, *महाराष्ट्रांतील शेंकडों गांवीं* संघाच्या शाखा निघून त्याचे हजारों समासद व्हावेत, अखिल बृहन्महाराष्ट्र श्रीसमर्थांच्या झेंड्याखालीं यावा. आतांपर्यंत विशेष प्रयत्नावांचून त्याच्या तीस पस्तीस शाखा निघाल्या आहेत व सर्व शाखांचे मिळून सुमारें सातआठशें सभासद झाले आहेत.

( १८ ) *अशीं हीं चार कार्यें सभेनें आरंभिलेलीं* आहेत. वास्तविक हीं सत्कार्यें आहेत, त्यांत संकटें येऊं नयेत व कोणी विघ्नें आणूं नयेत. पण दुर्दैव असें आहे कीं, या हि कार्यांत संकटें आणि विघ्नें मार्ग आडवून कांहीं काळ परीक्षा पाहतात आणि मग बाजूस सरतात. अशा वेळीं मला कृष्णेश्वरांच्या ओव्यांची हटकून आठवण होते. त्या ओव्या मी एकवार श्रीसमर्थमंदिराच्या वृत्तान्तांत सादर केलेल्या आहेत. तात्पर्य,

> संकटाचा कांहीं । येवों नेदी वारा ।
> वारितो पसारा । स्वामी माझा ॥

असो; अशीं हीं सभेनें आरंभिलेलीं चार कार्यें आहेत. तीं चार हि स्वतंत्र आहेत. प्रत्येक कार्याचे चालक वेगळे, जमाखर्च वेगळे, घटना वेगळ्या. त्या चारीं कार्यांचा *मी च एक चिटणीस असल्यामुळें मला तीं चारीं कार्यें* सारखीं च प्रिय आणि अगत्याचीं वाटतात. चालकांनीं मनांत आणल्यास उद्यां हीं चारीं कार्यें अलग अलग होऊं शकतील. तशीं तीं एकवार व्हावीं हि, एरव्हीं तीं चळावणार नाहींत, अशी मला भीति वाटते. सर्वांनीं च या चारीं कार्यांचा सारखा च अभिमान वा भार वाहिला पाहिजे, असें नाहीं. चारीं कार्यांचें **श्रीसमर्थभक्तिप्रेम** हें एक मूळ सूत्र कायम असलें म्हणजे झालें.

( १९ ) वृत्तान्त संपला. गेल्या ४७, विशेषतः ३८ वर्षांच्या कालाकडे व त्यांत झालेल्या या कार्याकडे मी मागें वळून पाहूं लागलों म्हणजे मी दिपवून जातो. हा सर्वत्र पसरलेला एवढा मोठा संग्रह एकत्र आला कसा आणि कां, आंबेस मंदिर बांधण्याची परवानगी कशी मिळाली, लहानसा खिळा मिळण्याची जेथें पंचाईत, त्या गांवीं एवढें मोठें नयनमनोहर मंदिर कसें उभारलें गेलें, त्याला लागणारे हजारों रुपये कोणी पुरविले आणि त्या मंदिरांत येऊन श्रीसमर्थ उभे कां राहिले

आहेत ? या प्रश्नांचीं जीं उत्तरें मी माझ्या मनांत देतों, तीं च येथें, निरहंकार वृत्ति धारण करून प्रकट करीतों. हें माझें सामर्थ्य नव्हे—शरीराचें नव्हे, बुद्धीचें नव्हे, पैशाचें नव्हे. मी दुर्बल आहें. श्रीसमर्थांच्या च मनांत आलें आणि रस्त्यानें जाणाऱ्या कोणा हि भिकाऱ्याला पकडून, त्याला निमित्त करून हीं कामें त्यांनीं करविलीं. ज्यांनीं तीं घडवून आणलीं, ते च तीं पुढें चालवितील. मला त्याची काळजी कशास हवी ? सत्कार्योत्तेजक सभा काय आहे, तिची घटना कशी आहे, तिचे सभासद कोण कोण आहेत, इत्यादि प्रश्न मला विचारण्यांत येत असत आणि मी उत्तर देऊं शकत नसे. आज सांगतों. हा सारा एकतंत्री कारभार चालला. त्याला नियमबद्ध स्वरूप देऊन कांहीं संघटणा करावी, म्हणून मी दोन चार वेळां प्रयत्न केले, पण ते फोल ठरले. तेव्हां मीं मनानें ठरविलें, महाराष्ट्रांत जे जे कोणी श्रीसमर्थाभिमानी आहेत, या त्रिविध या चतुर्विध कार्याला एक रुपयापासून पांच हजारापर्यंत ज्यांनीं ज्यांनीं मदत केली आणि जे अजून हि करीत आहेत, ते सारे सत्कार्योत्तेजक सभेचे सभासद होत. ज्या ज्या घरीं श्रीसमर्थांची वाङ्मयमूर्ति आहे, निदान श्रीमत् ग्रन्थराज दासबोध आहे, त्या त्या घरीं श्रीसमर्थ विराजत आहेत आणि त्या त्या घरांतील बाल, वृद्ध, नर, नारी, सारीं माणसें स. सभेचे सभासद होत. तात्पर्य, महाराष्ट्रांत सत्कार्योत्तेजक सभेचे हजारों, लाखों सभासद आहेत, फक्त त्यांची एका जागीं नोंद केलेली नाहीं. श्रीरामदासी मासिकाचे वर्गणीदार व वाग्देवतामंदिराचे सभासद हे सारे सभेचे नोंदलेले सभासद म्हणावयाचे. पण या हि शिवाय, श्रीमंत सौ. मा. महाराणी इंदिराबाई साहेब होळकर, श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधी, कै. श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन, श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर, श्रीमंत प्रताप शेट, नामदार दादासाहेब मावळंकर, श्री. अनंत सखाराम वणीकर, न्यायमूर्ति महादेव विष्णु भिडे, पुरुषोत्तम मंगेश लाड, रावजी जनार्दन भिडे, काशीनाथराव वैद्य, पांडुरंगराव जोशी, अंबादासराव, नरसोपंत बोरामणीकर, श्रीमंत धुंडीराज मालेराव, काका जोशी, चौंडेमहाराज, महादेव पांडुरंग प्रभुणे, दत्तात्रय वासुदेव शिदोरे, सौ. कमलाबाई शिदोरे, रंगनाथ दामोदर जेजूरकर, भार्गव विष्णु काणे, डॉ. लक्ष्मण वासुदेव परांजपे, बाळकृष्णराव दत्तात्रय, त्रिंबक बाळकृष्ण जोग, सदाशिव विनायक बापट, हरि गणेश आंबेकर, कृ. वि. सरंजामे, सदाशिव गणेश फटके, भवानीशंकर रामचंद्र हेबळे, जयराम विष्णु वैद्य, गोविंद चिंतामण नातु, दत्तात्रय सीताराम जोशी, नारायण दामोदर खांडेकर, विष्णु अनंत देशपांडे, रा. ब. एल्. एम्. आर्. खेर, भगवंत नीळकंठ देवस्थळी, रामजी लक्ष्मण घरत, शंकर सखाराम शेळे, अनंतदास रामदासी, रघुनाथ भाऊराव दिवेकर, भाऊराव ना. करी, त्रिंबकराव या. देहनकर, भास्कर रामकृष्ण कुशेळकर, डॉ. मोतीराम बाळकृष्ण वेलकर, लक्ष्मण गंगाधर काटे, रामकृष्ण

महादेव कुळकर्णी, गणेश गोविंद नवरे, श्रीनिवास विश्वनाथ परांजपे, गणेश विठ्ठल करंदीकर, केशव भिकाजी टवळे, महादेव बाळकृष्ण आपटे, गंगाधर माधव वांदे, रामचंद्र शेषाद्री नाईक, डॉ. गंगाधर कृष्ण किर्लोस्कर, रामचंद्र त्रिंबक देव, पंडितराव विश्वनाथराव महाजन वैद्य, दत्तात्रय त्रिंबक देव, गंगाधर विष्णु पुराणिक, काशीनाथ चिंतामण ब्रह्मे, कृष्णाजी विठ्ठल अळूटकर, गोखले डॉक्टर, बापुसाहेब मेघश्याम, गणेश राजाराम परांजपे, डॉ. हरि पांडुरंग टवळे, रामचंद्र नारायण केळकर, नारायण गोपाळ जोशी, रामचंद्र गणेश एकबोटे, नीळकंठराव पाटणकर, डी. वी. कुळकर्णी, गणेश हरि पेठे मोतीवाले, हरि पंढरीनाथ वहिरट, मोरेश्वर दत्तात्रय क्षीरसागर, नारायण गोविंद फाजळे, महादेव बजाजी वीरकर, सौ. सरस्वतीबाई कात्रे, डॉ. नरहरि यशेश्वर चितळे, गणपतराव पीराजी सनईवाले, भालचंद्र धोंडो भोपटकर, बापू. बी. पंडित, गणेश दत्तात्रय गोखले, नारायण गोपाळ फडणीस, दिनकर महादेव खेर, विष्णु श्रीधर मायदेव, व्यंकटराव कल्याणपुर, श्रीधर माधव भगाडे, डॉ. सौ. इंदिराबाई नियोगी, श्रीमंत सरदार माधवराव किबे साहेब, चिं. वा. खाडिलकर, विष्णु सोनु कुळकर्णी, बापु श्रीधर वर्झे, केशव यशवंत काळे, काशीआक्का जोशी, मोरेश्वर शंकर देव, गोपाळराव गोगटे, गणेश गोविंद टकले, रामेश्वर शेट, दुर्गाराम बालहरिदास, जे. एस्. नेरूरकर, गोविंद लक्ष्मण बेडेकर, मोरेश्वर लक्ष्मण कानिटकर, विष्णु गणेश गाडगीळ, इत्यादि बृहन्महाराष्ट्रांतील लहानथोर श्रीरामदासांकित निष्ठावंत सर्व जण, वर्षाला, महिन्याला, किंवा मागावें तेव्हां २ रुपयांपासून ३६० रुपयापर्यंत श्रीसमर्थांच्या त्रिविध कार्याला साहाय्य करणारे सत्कार्योत्तेजक सभेचे पहिल्या वर्गातील सभासद होत. असें हें सत्कार्योत्तेजक सभेचें व्यापक स्वरूप असल्यामुळें त्रिविध कार्यांच्या योगक्षेमाची आपणांस काळजी करण्याचें कारण च काय ?

( २० ) चाळीस वर्षे झालीं म्हणावयाचीं, आम्ही या कार्यांचा भार वाहिला. फलप्राप्ति फार थोडी झाली याची जाणीव आम्हांस आहे. प्रयत्नाची आमच्या कडून कसूर झाली नाहीं, पण आम्ही अल्पमति असल्यामुळें आमच्या हातून जास्त कार्य होऊं शकलें नाहीं. यापुढें आतां या कार्यांचा भार वाहण्यास आम्ही असमर्थ आहोंत. आम्ही थकलों आहोंत. जी थोडी शक्ति उरली आहे ती आतां जीवाच्या उरलेल्या एका च कार्याकडे खर्च झाली पाहिजे. बाकीचीं कार्यें पुढिलांनीं पुढें चालविलीं पाहिजेत. तेव्हां आतां शेवटीं माझ्या स्वतःच्या, माझ्या मित्रांच्या, माझ्या गुरुदारांच्या, माझ्या उपकारकर्त्यांच्या, श्रीसमर्थकार्यावर प्रेम करणाऱ्या असंख्य अपरिचितांच्या, सर्वांच्या पुत्रपौत्रादिकांना माझी विनंति इतकी च कीं, श्रीसमर्थांच्या चरणीं लक्ष लावा, चतुर्विध च काय पण सहस्रविध दिशांनीं त्यांची सेवा करा, त्यांच्या

आज्ञा पाळा, आचारविचारांचे त्यांनीं घालून दिलेले धडे गिरवा, त्यांनीं दाखविलेल्या मार्गानें जाण्याच्या तयारीला लागा, नव्हे, जाऊं लागा, त्यांच्या सान्निध्यांत त्यांना पहा, त्यांची अहर्निशीं करुणा भाका. ते कृपा करतील, हा विश्वास बाळगा. त्यांत च आपलें, आपल्या धर्माचें, आपल्या राष्ट्राचें कल्याण आहे, हें निश्चित समजा. मला विसरा, क्षमा करा.

श्रीसमर्थवाग्देवतामंदिर–धुळें
१८६२ वैशाख व. ११ ( १-६-४० )

